


श्रीराम.



संगीत

# विनोद नाटक.

लेखक व प्रकाशक

**महादेव नारायण जोशी,**

संगीत कृष्णाविजय व कर्णार्जुन इ. नाटकांचे कर्ते.

सदाशिव पेठ ९९ पुणें.

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर, जगद्धितेच्छु प्रेस,

शनिवार पेठ, ४३२ पुणें.



सन १९१६.






किंमत ८ आणे.

# प्रस्तावना.



"So much laughter so much life enjoyed."

—*Burns*.

या कष्टमय संसारांत प्रपंचाची चिंता वाहून थकलेल्या जिवांस आनंदांत चार घटका घालविण्यास सांपडल्या तर, त्यांचें ओझें हलकें वाटून तेवढा काळ सुखाचा गेला असें वाटल्यावांचून राहणार नाहीं, म्हणून नैसर्गिक बंधुभावास विरोध आणणाऱ्या मतभेदास रजा देऊन, ज्यांत केवळ हास्य-विनोदावांचून दुसरें कांहीं नाहीं असें एखादें नाटक लिहिणें आणि त्याचे प्रयोग दाखवून जनतेचें मनरंजन करणें अनुचित होणार नाहीं, असें मला वाटलें. प्राचीनकाळचे साधेसुधे व्यवहार आणि आचारविचार सुधारणेच्या मार्गास लागलेल्या समाजास सोडीत जावे लागतात, आणि नव्यांचें ग्रहण करावें लागतें. ही अदलाबदल अगदीं अपरिहार्य आहे. पुष्कळ प्रकारें ती इष्टही आहे याबद्दल वाद नाहीं. परंतु ती अदलाबदल होत असतां उतावळेपणा झाला, पुरा विचार झाला नाहीं, किंवा खराच संभ्रम झाला, तर कसे घोटाळे होतात आणि लोकांच्या थट्टेस आपण कसे पात्र होतों, हें सहजानुसार लोकांस सुचवावें असा माझा विचार आहे. सुधारणेशीं किंवा तदनुषंगिक प्रयत्नांशीं तत्त्वतः माझा मुळींच विरोध नाहीं; सुधारणेच्या शकटांत बसलेला मीही एक प्रवासी आहें. परंतु इष्ट मार्गानें जाणाऱ्या गाडींतील एका प्रवाशानें पुढील अडचण गाडीवानास दाखवूं नये, किंवा खाचाखोंचा, लवणें, वळणें पाहून जपून गाडी हांक ह्मणून इषारा देऊं नये असें नाहीं. मीही या कृतींत याहून जास्त कांहीं करीत नाहीं. थोडें जपून पाऊल टाका, भडकूं नका, येवढेंच मला सुचवावयाचें आ[illegible] आणि तें सुचविण्याचा हा मार्ग मीं पसंत केला आहे. यांत कोणत्या[illegible]ही व्यक्तीस किंवा व्यक्तिसमुदायास दुखवावें किंवा कर्तव्यविन्मुख करावें अस[illegible] माझा हेतु नाहीं. या माझ्या हेतूकडे लक्ष देऊन महाराष्ट्र लोकसमाज माझ्या या अल्प प्रयत्नाचा स्वीकार करो अशी प्रार्थना आहे.

ज्या नाटकमंडळीनें हें नाटक उत्सुकतेनें व मेह
रूपानें आणिलें त्या नूतन संगीत नाटकमंडळीचा म
तसेंच माझ्या या अल्पकृतींत ज्या माझ्या मित्रमंडळ
युक्त सूचना केल्या त्यांचेही आभार मानणें अवश्य

या माझ्या कृतींत:दोष असणें साहजिक आहे; त
लक्ष देऊन—

प्राज्ञो हि जल्पतां पुंसां श्रुत्वा वाचः शु
गुणवद्वाक्यमादत्ते हंसः क्षीरमिवांभसः

ह्या वरील उक्तीप्रमाणें माझे सुज्ञ वाचक व प्रेक्षक या
अशी आशा बाळगितों.

**महादेव नारायण**







श्रीराम.

# संगीत विनोद नाटक.

## मंगलाचरण.

पद—( तेंडेरे कारन मेंडेरे० )

प्रथम नमन करित माधवा ॥ चरणा ॥ वाहुनि पदिं मन
सुमना ॥ ध्रु० ॥ अंधां नयनां मूकां रसना । देसि कृपेक्षणिं ॥ १ ॥
रंगभूमिस्थलिं पामरहातीं रंजवि बुधजन ॥ २ ॥

**माधवः**—या मंगल प्रसंगीं हा प्रसन्नवदन असा जमलेला रसिक जनांचा आबालवृद्ध समुदाय पाहून मला अत्यानंद होत आहे, तरी पण ह्या रसिक जनांचें आपल्यासारख्या अल्पमति व नाट्यकलानभिज्ञाकडून कितपत मनरंजन होईल, अशी मनाला सारखी हुरहुर लागली आहे. मोठमोठ्या प्रासादिक कवींच्या अनुपमेय काव्यलालित्याचा, हृदयंगम कल्पनाचातुर्याचा अप्रतिम मधुर वाणीचा निरंतर मकरंदस्वाद घेणारे हे रसिक भ्रमर आज या ठिकाणीं कसे संतुष्ट होतील ते होवोत !

**विनायकः**—ही तुझी चिंता विफल आहे. प्रत्यक्ष श्रीकृष्णानें भक्तीनें अर्पण केलेले सुदाम्याचे पोहे देखील प्रेमानें नाहीं कां भक्षण केलें ? आपले वेडेवांकडे चार शब्द जरी असलें तरी हे रसिक जन अत्यंत प्रेमानें श्रवण करून वैगुण्याची क्षमाच करतील. हे सर्व अबालवृद्ध रसिक जन आपलें नाटक पाहण्यास कसे उत्सुक झालेले दिसतात, तर प्रथम आपण नाटकासच प्रारंभ करूं.

**माधवः**—ठीक ! पात्रांची सर्व सिद्धता आहे ना ?

**गणपतिः**—अगदीं सर्व सिद्धता आहे. चला तर, मनांत अगदीं शंका आणूं नका ! मोठमोठ्या कवींच्या काव्यरूपी पक्वान्नांचा निरंतर स्वाद

चाखणारे हे रसिक पक्वान्नानें देखील विटले नसतील कशावरून ? चला आपल्या सुदाम्याच्या पोह्यांचा ते प्रेमानें स्वीकारच करतील ! चल तर ह्या बुधजनांचें वंदन करून आपल्या कार्यास सुरवात करूं.

पद—( अभिवादना करित )

बुधमंडला नमन करित हें ॥ विमलपदाला ॥ ध्रु० ॥ मनुज प्रमादा क्षम्यचि झाला ॥ प्रमादविरहित कोणि न दिसला ॥ सकलकला केवळ श्रीहरिला ॥ हंसक्षीरन्यायेंचि करावें ग्रहण गुणाला ॥ १ ॥ सादर परिसा माधव बोला ॥ अल्पमतीनें विनोद केला ॥ अधिक उणा वा शब्द योजिला ॥ क्षमा करावी त्याची विनती तुम्हाला ॥ २ ॥

( जातात. )





# अंक पाहिला.



## प्रवेश १ ला.



**सीनः**—( टेनिस-ग्राउंड–समोर जाळीचा पडदा–चेंडू फेकणारीं, चहा देणारीं व वर्तमानपत्रें विकणारीं मुलें–कांहीं मंडळी टेनीसचा खेळ पाहात आहेत, चिरूट ओढीत आहेत, चहा पीत आहेत, वर्तमानपत्रें वाचित आहेत. तारा–इंदिरा–दामिनी–वामनराव—वसंतराव ).

**इंदिराः**—गेम ! गेम ! गेम ! का डॉक्टर ! शेवटीं माझीच गेम झाली ना पण ? कशी पण चापून लव्हगेम अगदीं ! याला म्हणावी सणसणीत गेम !

**वसंतः**—अं–त्यांत काय मोठेंसें ! बरें, पण आतां आपण साईड चेंज करूं या.

**इंदिरा**—मी नाहीं गडे आतां मुळींच साईडचेंज करणार !

**ताराः**—साईड चेंज केल्यावर डॉक्टर तुम्ही गेम करणार आहांत का पण ? नाहीं तर कशाला उगीच साईड चेंज करायची ? आहे तेंच ठीक आहे.

**वामनः**—आयसे, स्टॉप इट, लेट्अस् बिगिन्. बॉय, चेंडू लाव जलदी. हं दामिनीबाई—करा प्रथम तुम्ही सर्व्हिस–( ती सर्व्हिस करते ).

**दामिनीः**—हं फिफटीनलव्ह ! कसा पण पॉईंट मिळवला !

**ताराः**—डॉक्टरांचा ड्राइव्ह चांगला फोर्सिबल आहे हो अगदीं !

**इंदिराः**—पुरे झाली त्यांची स्तुति. हा पहा माझा पॉईंट. फिफ्टीन ऑल् ! कसें हटकून कॉर्नर प्लेसिंग आहे पाहिलें !

**वसंतः**—ओ हार्ड लाइन्स ! सॉरी पार्टनर !

**दामिनीः**—नेव्हर-माईन्ड, गो ऑन पार्टनर ! स्मॅशइट ब्रेव्हली ! स्मॅशइट !

**इंदिराः**—ग्रँड, स्प्लेन्डिड, वेल प्लेड ! डिअर वामनराव, व्हालिढ ! थर्टी फिफ्टीन !

**तारा**—इश् ! हें काय बाई ! डॉक्टर सारखे लॅबींत बॉल प्लेस करीत आहेत.

**वामन**—नेव्हरमाईन्ड ! हें पहा फार्टी फिफ्टीन !

**डॉक्टर**—ठीक आहे ! पहा ! तुम्हांला स्मॅश करून दाखवितों !

**इंदिरा**—डॉक्टर ! तुमचा मुळींच फेअर-प्ले नाहीं ! एक तरी बॉल धड सेंटरमधें आहे का अजून ! स्मॅश करतात कपाळ ! करा पाहूं स्मॅश ! हें पहा मी टॉस करतें.

**वसंत**—ठीक आहे. हूइट् ( चुकतो ) ओ सॉरी हार्ड लाइन्स पार्टनर !

**इंदिरा**—झालेंना ! गेम ! गेम ! गेम ! आतां तरी माझ्यावर गेम करण्याची गेली ना तुमच्या मनांतली खुरखुर ! स्मॅश करताहेत डोंबल आपलें ! डॉक्टर ! तें कांहीं कोल्ड्रींक पिणें नव्हे ! ( सर्वजण बाकांवर व खुर्च्यांवर बसतात )

**तारा**—अग कोल्ड्रींक कसलें ! परगेटिव्ह घेणें म्हण ! खरेंच बाई ! मी मघाचपासून उगीच आपली सारखी गंमत पहात होतें. डॉक्टर सारखे बॉल ट्विस्ट करीत होते, एक तरी फाइन रिटर्न होता का ? नुसते बॉल ट्विस्ट करून कट् करून का कुठें गेम होते !

**दामिनी**— चल ! चारगट कुठली ! एखाद्याला अगदीं पाण्यांत विर-घळून टाकावयाचें म्हणजे काय ! भागू ! चहा लाव जलदी ! ( चहा आणतात. )

**तारा**—बरं बाई ! राहिलें ! एक्सक्यूज ! बेग युअर-पार्डन् ! ( चहा घेतात. )

**दामिनी**—गो ऑन, डॉक्टर ! नेव्हर माईन्ड, टेकइट, इटस् नॉट मच् ! आण् केसू ! आण तो इकडे चहा ! भागू थोडी फॅमिली बिस्किट्स आण !

( वर्तमानपत्रें विकणारीं पोरें प्रवेश करतात. )

**१ ला**—संदेश ! संदेश ! वत्सला वहिनींची काहाणी—दोन पैसे.

**२ रा**—ज्ञानप्रकाश ! लढाईची ताजी-बातमी ! म्युनसिपलइलेक्शन-बद्दल मेंबर्सच्या जॉलीपार्टीज ! त्यांचीं मतें मिळवण्याची प्रचंड धांदल ! गांवांत केरांचे सिंहगडासारखे ढीग ! एक पैसा !

३ राः—आठवड्याचा केसरी ! केसरी ! मवाळांचा समेट ! हिंदुस्थानला होमरूल.

४ थाः—टाईम्स ! एक आणा ! अलाईज ग्रँड सक्सेस.

बांबे-क्रानिकल ! एक आणा ! सोशिअल ब्लंडर्स ! एक आणा !

( सर्वजण वर्तमानपत्रें विकत घेतात. )

वामनः—अरे भागू ! एक कप, मिल्क आण पाहूं ! ह्या मनोहर इंदिरेच्या चंचल लीला पाहून कोण चंचल होणार नाहीं ! ही जर मला लाभेल तर त्या आनंदापुढें ग्रीसला देऊं केलेलें सायप्रस बेट मला वंशपरंपरेनें बक्षीस दिल्याबद्दल झालेला आनंदहि मी तुच्छ समजेन. आज किती दिवस मी ह्या खबूतराचा प्रयत्न करीत आहें, पण यावें असें मुळींच यश नाहीं ! कोणच्या परमेश्वरानें ही लावण्यनगरी निर्माण केली तें कळत नाहीं ! ही नगरी निर्माण करण्यांत अत्यंत आनुभविक व चतुर अशा इंजीनिअरची योजना त्या परमेश्वरानें केली असली पाहिजे ! पण—पण नाहीं, जों जों हिच्याकडे पाहावें तों मला आपलें बोलणें परत घ्यावेंसें वाटतें. किती बांधेसूद मोहक देखावा हा ! खरोखर हें टॉऊन प्लॅनिंग एका ब्रह्मदेवानें केलें नसून स्वर्गांतील झाडून सर्व देवांचें कौन्सिल बसलें असलें पाहिजे ! त्या शिवाय इतकी व्यवस्थित अशी सुवर्ण नगरी होणेंच शक्य नाहीं ! अहाहा !

पद—( रूमझूमबदारिया )

प्रेम हेम नगरी ही विलसे ।। शृंगारियली दिसे ।। अनंग-<br>मंदिर कुच भासे ।। ध्रु० ।। कुसुमालंकृत कुंतल बगिचे ।।<br>कारंजीं नयनांगणा ।। कटि क्रीडांगण, भृकुटिध्वजा करि<br>खेलना ।। १ ।।

कांहीं असो. मी हिचा निर्भीड व ममताळूपणें प्रयत्न करणारच ! काय वाटेल तें होवो. वेल ! लेटस गो नॉऊ !

डॉक्टरः—ऑल् राईट् कम् अलाँग् देन्

( सर्व जातात व गोपाळ प्रवेश करतो. )

गोपाळः—इथें तर कुणीच नाहीं ! आज आमचे हे यजमान कुठें भडकले; काय इरसाल आहेत पण ! असलें हें स्वयंभू पात्र कालिदासाच्या काकालासुद्धां त्याच्या कल्पनासृष्टींत निर्माण करणें कठीण; मग सध्यांच्या काळीं तर बोलायलाच नको; पुष्कळ बारकाईनें मीं पाहिलें, कालेजांत, पाठशाळांत, जिमखान्यांत, वकिलाच्या क्लबांत, म्युनिसीपालट्यांत, संमेलनांत, आणखी शंभर ठिकाणीं ! पण आमच्या यजमानासारखें जातीवंत एक देखील नाहीं ! आहेत ! मीं शोधलें त्या ठिकाणीं अगदीं नाहींत असें नाहीं. पण शेपूट आहे तर कानाची लांबी कमी; कान चांगले हातभर तर शेपूट नाहीं. दोन्ही असले, तर उंचीला, रंगाला नाहीं असें होतें, पण या सर्व गुणांचें संमेलन आमच्या एकट्या यजमानांतच ! छे ! यांची चाकरी म्हणजे सुळावरची पोळी आहे ! स्वतःच्या फायद्याचें देखील असेंना कां, कीं पडलेच पालथे मध्यें, ढकललेंच अकलेचें घोडें मध्यें ! मग त्यांत स्वतःचें वाटोळें झालें तरी हरकत नाहीं; दोन हणा पण शहाणा म्हणा ! असलें यंत्र आहे हें ! या गाढवाला अशी घमेंड आहे, कीं त्याच्यासारखा धूर्त, कावेबाज, विद्वान, चतुर दुसरा कोणी नाहीं. पण मी सांगतों, एखादें पोर देखील त्याच्या हातावर तुरी देईल ! म्हणतो काय ! मी सर्व सुधारकांचा, कुधारकांचा, उद्धारकांचा मोहरक्या आहें. आम्हांला स्वराज्य पाहिजे ! दोन तोंडांत पाहिजेत; हें सुधारणेचें इराणी तट्टू म्हणे आतां लग्नाला हुराळलें आहे; कोण याच्याशीं लग्न लावतें देव जाणे ! अर्र्र् ही पहा आलीच स्वारी. बरोबर कोण, आमच्या संगीत सुंदराबाई ! जमला जोड आतां—

( शंकरराव सायकल घेऊन सुंदराबाईसह प्रवेश करतात. )

सुंदराः—( रुमालानें घाम पुशीत व छत्री मिटवीत ) कां शंकरराव ! अगदीं सोळा आणे झालें ना ! कशी पण नामी युक्ति केली, आतां तुमचें नि तिचें अगदीं ठीक जुळेल. तिला अशा रीतीनें तुमच्याच वाड्यांत बिऱ्हाडाला उतरविल्यामुळें, कशी पण अगदीं दुधांत साखर पडल्यासारखें झालें ! शंकरराव, अगदीं एक्सलेंट् !

शंकरः—थँक् यू, थँक् यू सुंदराबाई ! अगदीं नामी, पसंत, वेल डन् !

तां आमची कोर्टशिप ठीक जुळेल ! का गोपाळ ! कशी आहे आमची
क्ति ! हाउ डु यू लाईक इट्!

गोपाळः—शाबास, ही तुमचीच युक्ति ?

सुंदराः—मिस्टर शंकरराव ! मी तुम्हांला बरेंच दिवस विचारीन म्हणतें; काय
। ! आतां तुमच्या मनानें त्यां, राधाबाईविषयीं घेतलें ही गोष्ट निराळी,
ण आपण या भानगडींत पडण्यापेक्षां पुनर्विवाहालाच उदार आश्रय द्याय-
ला पाहिजे होता; कारण किती जरी झालें, तरी ह्या अनभिज्ञ अल्लड चटोर
ोरींच्यापेक्षां आमच्यांतल्या पुनर्विवाहाच्या जास्त करत्यासवरत्या व अ-
नुभवशीर अशी अजून देखील नाहीं का तुमची खात्री पटू ! नवल
आहे बाई अगदीं !

शंकरः—हं-हं-हं ! नाहीं आहे खरेंच म्हणतां तें ! पण सध्यां हें
जुळलें तर पाहूं ! नाहीं तर आहेच आपलें हें ! कुठें पळतें थोडेंच.

गोपाळः—कशाला पळतें आहे. चुकला फकीर मशिदींत ! कुठें नाहीं
जमलें तर आहेच आपला धोपट मार्ग.

सुंदरा—तसें नव्हे ! पण अहो, तुमच्यासारख्या धनिक, सुशिक्षित,
ग्राजुएटाँनीं जर ह्या बाबतींत पुढाकार घेतला नाहीं तर बाई चालणार
तरी कसें !

गोपाळः—खरेंच; अशा लोकांनीं शेपूट गाळून कसें चालेल.

सुंदराः—पुरुषांनीं आणखी देखील चार उकिरडे फुंकले तरी
चालतात; मेले भटुर्गे देखील चवथ्या लग्नाची तळी उचलायला
तयार ! आणि आमच्या बायकांत बिजवधू दुसऱ्यानदांच का असेना.
लागले मेले बहिष्कार बहिष्कार ओरडायाला. लाजा नाहीं वाटत मेल्यांना !
शंकरराव, तें कांहीं नाहीं ! तुम्हीं तरी आमचा पक्ष उचललाच पाहिजे,
सुशिक्षितना तुम्ही ! सुधारकांचे अध्वर्यु म्हणवतांना तुम्ही ?

शंकरः—( गळ्यांतील सुवर्ण पदकांची सर्व माळ दाखिवतो )
स्टॉप ईट, स्टॉप इट् तुम्हीच आहांत म्हणून मी गप्प बसतों ! ही पहा
मॅट्रीकपासून थेट एम. ए. एल एल. बी. पर्यंतचीं मिळविलेलीं सर्व
सुवर्णपदकें ! काव्य, व्याकरण तर्क व अलंकार या बाबतींत तर माझा
हात धरणारा कोणीच नव्हता ! अहो !

पद—( तीखेनैनाचित्रवन )

जगीं नच विफल होति मानपान ।। कुणि प्राणत्राण द्रव्य-
दान करिल ज्ञाण तोचि एक मिळवि मान ।। ध्रु० ।। अद्वि-
तीय बुद्धीबल दार्शनि, क्वचित होति मजसमान नरललाम ।। १ ।।

गोपाळः—हा यांचा तर्क निखालस चुकीचा आहे असें एखादा कुंभार देखील सांगेल ?

शंकरः—हीं पहा, तसेंच रावबहादुरी, म्युनिसिपालिटीचीं मानपत्रें वगैरे हीं सर्व खिशांत आहेत. दाखवूं का तुम्हांला ?

सुंदराः—छे, छे, मला ठाऊक आहे आपली ब्राईट करिअर—आपली कीर्ति का कुणाला ठाऊक नाहीं ?

शंकरः—सुंदराबाई ! तसें नव्हे—आणि—आणि—आणि काय म्ह-णतों आणि—

गोपाळः—तुमचें नशीब झालें, काय हरवलें कुणाला ठाऊक !

सुंदराः—आणि काय पुढें ?

शंकरः—अहाहा ! नेहमी आशा वाढविणारे आणीसारखें उभयान्वयी अवयव दुसरें कोणतेंच नाहीं.

गोपाळः—(अवयव ! ऐका व्याकरणाचे खंदक ) अहो, अवयव कसले घेऊन बसलांत ! अव्यय म्हणा अव्यय !

शंकरः—ओ नेव्हर माईंड स्लिप ऑफ टंग—सुंदराबाई आणि मी म्हणतों या बाबतींत तुमची मला फार जरूर असून तुम्हीं मला अगदीं मनोभावानें मदत केली पाहिजे. तिचें व माझें या बाबतींत पूर्वींच थोडेंसें सूतउवाच झालेलें आहे. तेव्हां प्रथम होतां होईल तों तिचा-च मी आटोकाट प्रयत्न करणार ! छे ! असे आढेवेढे कां ? तुमच्या क्लबाला चांगली भरपूर देणगी दिली म्हणजे मग झालें ना ? कां गोपाळ, असेंच ना ?

गोपाळः—हो तर काय ! साधारण असेंच झालं.

शंकरः—मग काय सुंदराबाई, ठरलें ना, तें कांहीं नाहीं ! तुम्हीं आमचा एवढा बार उडविलाच पाहिजे !

**गोपाळः**—(त्यांना नको बार उडवायला सांगायाला ! चांगल्या तर-बेज आहेत त्या. )

**सुंदराः**—आतां तुम्ही म्हणाताच तर करतें बाई प्रयत्न ! पण आपण आपल्या मित्र मंडळींना तरी—

**शंकरः**—त्याची नको हो तुम्हांला काळजी ! आमच्या विद्याविध्वंस कॉलेजातले एक सोडून पंचवीस स्नेही तुमच्याकडे पाठवितों ! मी आहें ना तुमचा पुरस्कर्ता !

**गोपाळः**—( तर काय! अचरटांना काय तोटा आहे ! अडकीव एक एक लोढणें गळयांत ! म्हणजे कळेल त्या बैलांना इंगा ! )

**शंकरः**—आतां काय सांगू तुम्हांला ? वाटेल त्या जातीच्या असल्या तरी ते मावार घेणार नाहींत ! आणखी काय सांगू !

**सुंदराः**—एक्झॅक्टली ! दॅट्स इट ! त्यांचा आपला रंग एक, रूप एक, रक्त एक, चामडें एक, इतकेंच नव्हे तर धर्म एक, देश एक ! काय हरकत आहे. नोहार्म ! मग ज्ञान, विद्या, नि देशोद्धार कसला !

**शंकरः**—आपल्या नि माझ्या व्ह्यूजमध्यें मुळींच अंतर नाहीं हो. बरें, पण राधेच्या जागेविषयीं काय केलेंत आपण !

**सुंदराः**—तिच्या वडिलांनीं जेव्हां मला साताऱ्याहून पत्र पाठविलें तेव्हां तुमच्याच वाड्यांत जागा चांगली असें मीं त्यांना कळविलें व त्यांना हा माझा प्लॅन् अगदीं पसंत पडला.

**शंकरः**—ओ ! दॅट्स् राईट् ! तुम्हांला नॅक् आहे ! युक्ति आहे ! खरोखर, मला देखील एखाद्या वेळेस अशी युक्ति सुचते कीं, चांगल्या मी मी म्हणणारांनीं सुद्धां चकित व्हावें !

**गोपाळः**—( काय गोष्ट आहे महाराज, तुमच्या अपरंपार ज्ञानसमुद्राची. ह्या समुद्रांत आजपर्यंत अकलेचीं कितीक ओंडकीं इतस्ततः वहातांना मी प्रत्यक्ष पाहतों. )

**शंकरः**—बरें, पण ती सर्व मंडळी कोणच्या गाडीनें येणार आहेत ?

**सुंदराः**—ती आणि गोविंदराव वगैरे सर्व मंडळी आतां दहाच्या गा-डीनें येतील. मी म्हणतें गोपाळरावाला स्टेशनावर पाठिवलें तर जास्त

चांगलें ! कारण त्यांना येथील फारशी माहिती नाहीं व त्यांचा थोडा त्रासही चुकेल.

शंकरः—बरें आहे. तेंहि ठीकच आहे—हो पण—मी म्हणतों, असें केलें तर नाहीं का चालणार, अशी युक्ति करावी; गोपाळरावाला पाठवावें, कीं का नको, का पाठवावें—मी म्हणतों—अरे थांब. मी आणखी कांहीं तरी युक्ती काढतों !

गोपाळः—शंकरराव ! आतां विचार करायाला नाहीं वेळ ! बोला लवकर—नाहीं तर सगळच फसेल. दहा वाजायाला आले.

सुंदराः—जा हो तुम्हीं गोपाळराव—डोंट् वेस्ट् टाईम.

शंकरः—ऑल् राईट्—लेट हिम गो—जाऊं देच तर

सुंदराः—हें पहा—त्या मुलीचा जरा चमत्कारिक एककल्ली स्वभाव आहे बरें का. तेव्हां थोडें बेताबातानेंच—

शंकरः—तुम्हांला मुळीं देखील काळजी नको. आतां मी आहें आणि ती आहे. पाहून घेतों दोघेजण—पहा कसें डोकें चालतें तें.

सुंदराः—तसेंच दुसरें सांगून ठेवतें. तिच्या वडिलांना आणखी एकानें मागणी घातली आहे व ते मागणी घालणारे स्वतः केशवरावही त्यांच्याच बरोबर इथें येणार आहेत; तेव्हां आतां तुम्हीं काम कसें पार पाडतां तें पाहतें. तुमच्या आशेला जागा एकच आहे ती येवढीच कीं, गोविंदरावांनीं वरपसंतीचें काम सर्वस्वीं मुलीवर सोपविलें आहे. तेव्हां पुन्हां सांगणें एवढेंच कीं, जरा वेळ-प्रसंग,मागचा पुढचा पांचपेंच लक्षांत आणून मग—

शंकरः—एवढें जें लांबलचक सांगतां तें मला तुम्हीं मूर्ख का समजतां—( पदकें व सर्टिफिकिटें दाखवितो ) एवढी का नाहीं माझ्यांत करामत ! डावपेंचांत निष्णात म्हणून तर मला कौन्सिलर देखील नेमण्याचा विचार लोकांचा ऐकतों ! अहो, अगदीं काम माझ्याकडे लागलें ! पहा तर माझी करामत मग म्हणा ! या वेळेस अनंत विचार, युक्त्याप्रयुक्त्या, डावपेंच यांनीं माझ्या डोक्यांत इतकी गर्दी करून सोडली आहे, कीं तुम्हांला काय सांगूं ! वेल आय टेक युअर लीव्ह ! मी जरा

सायकलवर थोडा राउंड घेऊन येतों (शेकहँड करून, घंटा वाजवून जातो.)

सुंदराः—बरें, तर मी देखील थोडी क्लबकडे जाऊन तिकडे येतेंच. (गेलासे पाहून) रेग्युलर डॉंकी-अजागळ मेला, कांहीं का असेना-पैसे काढले म्हणजे झालें, ह्या शतमूर्खाचें एवढें काम झालें, म्हणजे आमचें दारिद्र्य जाईल. ह्यांचाच भाऊ तो वामनराव. आतांशे माझ्या इंदिरेच्या मागें सारखा लुडबुडत असतो; त्याला देखील चांगला गुरफटला पाहिजे. चला तर-आधीं इंदिरेला चांगलें शिकवून ठेवलें पाहिजे (छत्री उघडून जाते).

## प्रवेश २ रा.



सीनः-(इंग्लिश फर्निचरनें श्रृंगारलेली खोली-इंदिरा-रॉकिंग चे-अरवर झोके घेत बसलेली दिसते. आरशांत पाहून वेणीफणी करते.)

इंदिराः—

पद—(मोहलियो छेलछबेला)

भांग असा उलटाचि शोभे मुखाला ॥ रंग हा गुलाबी खुलवि किति कपोला ॥ निटिलभागिं फुगिर केंस, चंद्र-कोर गोंदलेंहि भाला ॥ ध्रु० ॥ अंगिं तंग पोलकेंहि ॥ सुबक वसन स्कंधिंतेंहि ॥ करिं रुमाल पायिं लाल जोडा पुणेरी तयाला ॥ १ ॥

हा लेडीज् पायोनीअर रिक्रियेशन क्लब जॉईन केल्यापासून मनाला कसें मोकळेंचाकळें वाटूं लागलें आहे. आज वर्ष होत आलें एक दिवस देखील मनाला त्रास झालेला मला आठवत नाहीं. कोण ग बाई

मेला तो सासरचा त्रास ! रांधा, वाढा, उष्टीं काढा ! रांधा, वाढा, उष्टीं काढा ! अगदीं वैतागून गेलें होतें ! सासूनें मेलीनें सटवीनें तर भंडाऊन सोडलें होतें ! ये थेरडे आतां इकडे ! चांगलें तोंडाला बूटपॉलीश लावून पायपोस मारतें ! हो–सासूचा तरी काय दोष–तिकडे कुठे अंगांत पाणी होतें ! तिकडे माझे काय लाड होते म्हणा ! पंचविशीच्या आंतच खोकून खोकून खोकडासारखे झाले होते ! जवळ जाऊन बसेन म्हटलें, बोलेन म्हटलें, एकमेकाशीं विनोद करीन म्हटलें, तर कफ थुंकायला सदा थोबाडाला पिकदाणी चिकटलेली ! कसलें काय नि कसलं काय झालं, कधीं तरी क्षणभर सगवारीं नवसानें गांठी पडायच्या. लग्न झाल्यापासून हें असं होईपर्यंत आज आठ वर्षे तापल्या तव्यावर उभी होतें. तें कांहीं नव्हे. ह्या आम्हा बायकांना पुरुषांसारखें स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय त्यांना काडीचें देखील सुख लागायचें नाहीं. आतां मला किती स्वतंत्र वाटतें म्हणून सांग ! रोज रोज मेलें मूठ मूठ मांस वाढतें असें वाटतें ! आतांशा किं नाहीं, मला किती पण मौज वाटते ! हें रूप बघून व सतेज गाल बघून मला तर माझेच हे असे गालगुचे घ्यावेसे वाटतात.

पद—( क्षण एक जो )

मनिं मोद बहु होई ॥ रोमांचही देहिं जों जों स्वरूप हें ॥
मुखदर्पणीं पाहि ॥ ध्रु० ॥ धनु लाजवी भृकुटि ॥ वदनीं
अरुण कांति विमलाहि द्विजपंक्ति ॥ करि तेज स्फुट
पाहि ॥ १ ॥ तप करिति दंतमुनि ॥ अमृतस्थल बघुनि ॥
रसनाहि मधुवचनि ॥ जड वर्णनीं होई ॥ २ ॥

ह्या पहा आमच्या मैत्रिणी आल्या वाटतें. ( इलेक्ट्रिक बेल वाजते ) ( उठून ) कम् अलाँग ताराबाई कम् अलाँग, तारे, यमुने. ( तारा, दामिनी व यमुना प्रवेश करतात. )

**ताराः**—का इंदिराबाई–अभ्यास करून ठेवीत होतांत वाटतें ! परीक्षेची अगदीं झपाटून तयारी चाललेली दिसते ! होनाग यमुने ?

**यमुनाः**—अग तारे; आपल्याला न कळत अभ्यास करून पहिला नंबर पटकावणार आहे हो ती! असेंच नाग दामिनी?

**दामिनीः**—आणखी नाहीं ठाऊक; स्कॉलरशीप मिळावी म्हणून रोज रात्रीं दोन तास शिकवणी आहे ह्मणे! युक्लिडचे सिद्धांत, इतिहास, लॉजीक तसेंच शाकुंतलांतला पोर्शन रोज चालू आहे.

**इंदिराः**—दामिनी पुरे हो! तुमची जशी परीक्षेची मुळींच तयारी नाहीं वाटतें! कशाला घालतेस मेडिकल कॉलेजांत हेलपाटे मग तूं?

**ताराः**—तुला खरेंच सांगूं का इंदिरे! आम्ही दोघीजणींनीं आताशा टेनिसवर झोड दिली आहे. काल त्या वसंतरावावर तर पुन्हां चापून एक सेट दिला! तुला आठवतेंनाग दामिनी! शेवटच्या गेमच्या वेळेस वसंतरावाचा पॉइंट अगदीं व्हायच्या बेतांत आला होता, पण अशा युक्तीनें चेंडू प्लेस केला कीं, माझाच सेट!

**यमुनाः**—अस्सें अस्सें! म्हणूनच का काल तुझ्यावर ते धुसपुसत होते! आतां कारण कळलें!

**ताराः**—म्हणूनच मीं तोंडचुकवाचुकवी केली; मग लागलें त्या बॉयला शिव्या द्यायला, रोलर फिरवला नाहीं, असुक झालें नाहीं तमुक झालें नाहीं. मग आला बाई मला राग; त्या वसंतरावाला मीं म्हटलं, आतां कांगाव का करता; खेळतां येईना असें कां म्हणानात. ग्राउंडला काय झालं; ग्राउंड चांगली टणक आहे. खेळतांच कुठें येतें आहे?

**यमुनाः**—एकूण रागावले तर ते तुझ्यावर?

**ताराः**—अं! चालायचेंच नेहमीं! आतां ग्राउंडवर आले म्हणजे करीन म्हणा प्लीज! इंदिराबाई, आमचा आपला असा अभ्यास सुरू आहे! तुमच्यासारखें थोडेंच आहे आमचें. ती स्कॉलरशीप नको नि ती खट-पट नको!

**दामिनीः**—इंदिराबाईंना ह्या परीक्षेमुळें भारीच त्रास आहे हो अली-कडे—पण डिग्री फुकट नसते.

**इंदिराः**—खरेंच गडे, मला देखील त्रास आला आहे हो ह्या शिक-वणीनें! रोजीं जाग्रणें नि कॉलेजला उशीर होतो! पण गडे तारे, मास्तर चांगलें मन लावून शिकवतात हो!

ताराः—तुमच्यासारख्याच त्या तुंगाबाई–भारीच बाई अभ्यासी, रात्रंदिवस अभ्यास चालू होता.

दामिनीः—पण, ती महिना झाला आजारी म्हणून बापाकडे महाडला गेली आहे.

इंदिराः—इश्श ! इतकी आजारी बाई कशी पडली ?

दामिनीः—अलीकडे ती कशी चांगली गरगरली होती हो ! तोंडावर कसें पण तेज आलें होतें; नि परीक्षेच्या वेळेसच कशी बाई अशी आजारी पडली; काय बाई ऐकावें तें आपलें नवीनच !

तारा—हो कशी पडली, फार अभ्यासामुळें नि काय ! इंदिराबाई, म्हणून म्हणतें जरा बेताबातानेंच चालूं दे अभ्यास.

इंदिराः—सर्व खरं, पण हातीं धरलेलं शेवटाला लावलं पाहिजे ना ! मला नाहीं का सारखा अभ्यासाचा कंटाळा येत ! आतां त्यांतल्यात्यांत वेळ काढून थोडासा फुटबॉलचा एक्सरसाईज घेतें मी रोज. पण तेवढा पुरा नाहीं होत !

दामिनीः—हां येवढं मात्र नको बाई, मला मुळींच फुटबॉल आवडत नाहीं आणि बायकांचा तो खेळ नव्हे.

इंदिराः—हो-तर, बायका म्हणजे कांहीं जशीं माणसेंच नव्हेत. मला तर तो फार आवडतो ! ते कांहीं नाहीं जुन्या चाली मोडल्याच पाहिजेत !

दामिनीः—जरा जपूनच खेळा, परीक्षेची वेळ आली आहे; एखादवेळ जास्त खालीं वर पाय झाले म्हणजे तुंगाबाईसारखी स्थिति होईल हो ! ज्याचं त्याला कळतंच म्हणा; मी नको सांगायला.

ताराः—चला बाई जाऊं या आतां आपण. आज कोण उकाडा होत आहे, कशी झोंप येईल कोण जाणे.

यमुनाः—तहान देखील लागली आहे. इंदिराबाई कांहीं ड्रिंक आहे का ?

इंदिराः—हो हो. रास्बेरी, लेमोनेड, पिकमीअप् जें पाहिजें तें आहे !

दामिनीः—पिकमिअपच घेऊं या ( ग्लासमधलें पिकमिअप पाणी पितात. गडी ग्लास घेऊन जातो ).

यमुनाः—कोणच्या देवानें नानाप्रकारचे सुखोपभोग आणि विलास उत्पन्न केले; हें त्याचें त्यालाच ठाऊक.

पद—( आवोजी आव कृष्ण )

कोणि कळेना विश्वासि विस्तारिलें ॥ उद्यान विकासिलें ॥ चैतन्य खेळविलें ॥ ध्रु० ॥ पर्जन्य वर्षविले ॥ तरुवर पालविले ॥ फुलति फुलें ॥ वनिं विहंग बोलविले ॥ १ ॥ तारांगण प्रकाशिलें ॥ रात्रंदिन निर्मियलें ॥ स्नेहबलें त्रैलोक्य आकळीलें ॥ २ ॥ नरनारि घडविले ॥ लावण्या हंसविलें ॥ प्रेमजलें ॥ अणु रेणु नाहविलें ॥ ३ ॥

इंदिराः–तुमचें गाणें व ड्रिंक फारच प्लेझंट् लागलें बाई ! बरें कायग तारे ! आज ती मनोरमा कां नाहीं आली ?

ताराः–उद्यां आंग धुऊन येईल हो !

इंदिराः–नॉन्सेन्स ! अग पण प्रार्थनेच्या पुरतें यायला काय झालें ! हीच हीच अंधपरंपरा ! म्हणे आम्हीं सुशिक्षित ! डोंबल आलं आहे सुशिक्षित ! केव्हां हे समाजांतले क्षुद्र विचार जातील कुणाला ठाऊक !

ताराः–एकदम कसे जाणार ! जातां, जातां, जातील हळू हळू ! बरें येतों तर आम्ही–गुड् नाइट्–( जातात. )

इंदिराः—आतां आपणहि स्वस्थ पडावें. हो, बरी आठवण झाली, आज सुंदराबाईनीं माझ्याशीं महत्त्वाचें काम आहे असें सांगून एंगेजमेंट ठरविली. काय असावें बरें त्यांचें काम ! अजून नाहीं लक्ष्यांत येत ! अलीकडे त्या लेडीज बोटींग क्लब नि थिएटरबील्डिंगच्या बऱ्याच खटपटींत असतात ! फंडबिंड गोळा करायचा असेल झालें !–हा पहा कॉल आलाच. ( घंटा वाजते. टेलिफोनमध्यें बोलते. ) वेल् हू इज देअर ? व्हॉट, हू इज देअर, यस, कम अलॉंग. ( सुंदराबाई गळ्याला मफलर गुंडाळून चष्मा लावून प्रवेश करतात. )

सुंदराः—इंदिरे ! तुझ्याशीं कीं नाहीं आज माझें नाजूक काम आहे; पण तूं अगदीं मनोभावानें करशील असें आधीं मला वचन दिलें पाहिजे तर सांगतें. तसेंच माझ्याशीं अगदीं लपवालपवी करायची नाहीं.

इंदिराः—हें घ्या वचन; आपल्याशीं कां मी प्रतारणा करीन ? काय वाटेल तें सांगा; मी अगदीं उल्हासानें करीन.

सुंदराः—ओ थँक्यू. तर मग ( कानांत सांगतें ) यू म
बघ तर खरें! मग मला म्हण! सांगतें तसें तर करून पहा!

इंदिराः—मला तर बाई ते दृष्टीसमोर नकोत! काय बो
चालणें! अगदीं तिटकारा येतो!

सुंदराः—अग करीनात कां ते बडबड! आपण एका
कावें नि दुसऱ्यानें सोडून द्यावें!

इंदिराः—बाई! ऐकून घ्यायला कांहीं सीमा आहे ना
मचें मत सुधारणेकडे असलें तरी यांचा पंथ अगदीं वेगळाच
उपमांचें कसलें मेलें खूळ तरी तें—कान किटून जातात बाई

सुंदराः—अग सगळें खरें; पण पैसे आहेत ना! त्यांचे
वाईट नाहींत ना? आपण त्यांचें बोलणें मनावरच घेतलें
झालें! तूं थोडेंसें त्यांना नादीं लाव! म्हणजे वामनराव
त्याची लगड आहे लगड! समजलीस! तूं अगदींच त्यांना
टाकलंस म्हणे! अशी कां कूं का करतेस; सांगतें ऐक तरी.

इंदिराः—पण मला बाई त्यांना पाहिलें कीं रागच येतो

सुंदराः—अग पण बतावणी करायला काय जातें तुझं?
नाहीं अजुनी. तो देखील मोठा हौशी व सुशिक्षित आहे
नाहीं; अग प्रथम पैसे मिळवावे, इतकेंच नव्हे, तर वाटेल
करून, झीज सोसून मिळवावे आणि मग बसावें वाटेल त
प्रतिष्ठा मिरवीत नि जिवाचे चोचले करीत. प्रथम चांगलें त
तुडुंब भरलें म्हणजे मग फावल्या वेळांत स्वार्थत्याग, समाजसु
शिक्षण, बालसंगोपन, देशोद्धार, अंत्यजोद्धार आणखीं नाहींन
धतुरे जगापुढें मांडून आपलें प्रस्थ यथास्थित मिरवितां ये
नाहीं का नेहमीं अलीकडे पहात. आहे का त्यांत कांहीं अ
मेले एका माळेचे मणि! म्हणून म्हणतें तें कांहीं नाहीं, अ
नी फावल्यास विठोबा!

इंदिराः—मला बाई हें कसेंसेंच वाटतें! पण तुझी
करीन बाई.

सुंदराः—हें असें तुझ्यासारखें रडत राऊत का घोड्या

आज माझें वय जर तुझ्याएवढें असतें, तर दाखविले असते करून चार चमत्कार ! अग इंदिरे, उद्यां तो घोडागाडींत, मोटारींत बसवून फिरवूं लागला, नोटांचीं भेंडोळीं, दागदागिनें, हिऱ्यामाणकांच्या अंगठ्या देऊं लागला म्हणजे कळेल !

इंदिराः—( खरंच, उद्यां परीक्षा पास झाल्यावर चैनीसाठीं मीं पुनर्विवाह केला, म्हणजे मला कुणाकडे तोंड न वेंगाडतांना चापून पैसे खच करायला होतील. ) पण मी कुठें आपल्या आज्ञेबाहेर आहें आणि मला तरी नको का आहे ?

सुंदराः—ते आले म्हणजे थोडेंसें लाजावें, मुरडावें, हंसावें, गोड गोड बोलावें. असेंच हिरॉईनचें पुढें काम करणार का तूं?

इंदिराः—( लाजून मुरका मारते. )

सुंदराः—हा असाच अगदीं; असा थोडासा अभिनय करून लडिवाळपणा कर, मग पहा याचा काय प्रभाव आहे तो ! आपल्या पायोनियर जॉलीक्लबचा उद्यां बोटिंग् क्लब सुरू झाला किंवा लेडीज ड्रॅमॅटिक् युनीअन सुरू झाली म्हणजे, आपल्या थिएटरमधून तूं हलतां हलायची नाहींस ! खऱ्याट्यासारखे दाढीचे खुंट असणाऱ्या थोबाडापेक्षां आपले चेहरे स्टेजवर किती उठून दिसतील, तुला कल्पना तरी आहे का ? एकदां आपला खेळ लागूं दे, मग पहा कशीं पात्रें आणतें तीं ! इतकें कशाला लांब जायला पाहिजे ! आम्ही नुसते सैल बुचडे, लांब पदर, पायघोळ ओचे, बारीक कुंकूं, लावून सहज ऐटीनें रस्त्यांतून चाललों तर लोक कसे हुरळून बावळे होतात, एकमेकांला खुणावतात, चिमटे घेतात, तेच उद्यां आपला खेळ लागला म्हणजे अॅक्टिंग पाहून तर वेडावूनच जातील. आपल्याला पुनर्विवाहाबद्दलचे अर्ज फाईलाला लावून ठेवण्याकरतांच नुसते दोन क्लार्क लागतील. मी सांगतें, आपण पार्ट करूं लागल्यावर नाटकांतल्या स्त्रीपार्टी गोंडस पोरांच्या मागें लाळ घोटून गोंडा घोळणाऱ्या मोठमोठ्या विद्वान, अब्रूदार हुकमतदारांना देखील स्त्रीपार्टी पोरांना जवळ घ्यावेंसें वाटणार नाहीं. ज्या पुनर्विवाहाला वर शोधून दमल्या असतील, त्यांना तर आपली लेडीज अॅमॅच्यूअर कंपनी म्हणजे किमयाच ! मी तर म्हणतें, विलायतेंत जसें सर्व कुलीन स्त्रीपुरुषांना नाचणें अवश्य आहे तसा प्रघात आमच्यांत

देखील हवा. खरें म्हणशील तर, त्याच्यासारखी मौजच दुसरी नाहीं. पण बसले आहेत ना मेले आमच्या इकडे देशबुडवे ! नको; नको, करायला ! जाऊं दे, हा कोळसा किती उगाळायचा ! समजलीस ना ? ते आले म्हणजे एखाद्या वेळेस चहाच करून द्यावा, त्याची किंमत दोनशें रुपये सांगावी, गळपट्टा, मफ्लर, नेकटाईजच दाखवाव्या, असं किती किती सांगूं तुला ? तें कांहीं नाहीं बाई, आंगचेंच पाहिजे. तूं आपली माझी मैत्रीण म्हणून सांगतें हो.

इंदिराः—आतां शर्थ झाली बाई, सगळं करीन म्हणतें ना ! बरें बाई, पण त्यांनीं निकड लावली तर ?

सुंदराः—परीक्षा झाल्यावर बी. ए. एम. ए. झाल्यावर, अमुक झाल्यावर, तमुक झाल्यावर, बतावण्यांला काय कमी ? फारच झालं तर, दाखीव माझ्याकडे बोट; करतें मी संपादणी. माझ्या मनांत त्याच्याकडून चांगले पैसे काढावयाचे आहेत. अग, तूं एम. ए. होईपर्यंत तो कसला धीर धरतो धीर! केव्हांच मेटाकुटीला येईल !

इंदिराः—बरें, तर. पहा तर खरें, मी कसें काम पार पाडतें तें. आमचा विद्याव्यासंग फुकट जायचा नाहीं !

पद—( दावी पंथा अनुसरे )

विफलचिंता करितसा कां नवल भासे चुके नच न अणु ॥
ध्रु० ॥ चाप भ्रू चढवुनी ॥ नेत्रशरिं विंधुनी ॥ जाल स्मित पसरुनी ॥ मी धरिन मृग ॥ १ ॥ वेदना शरव्रणीं ॥ विकल करितां क्षणीं ॥ अधरजल पाजुनी ॥ संजिविन मृग ॥२॥

सुंदराः—याला म्हणावें काम ! मला ठाऊक आहे तूं चतुर आहेस ती. आज कीं नाहीं सातान्याहून गोविंदराव, राधाबाई, पुण्यास येणार आहेत. गोपाळरावांला मघाशींच स्टेशनवर पाठविलें. अजून कां बरं आले नाहींत ?

इंदिराः—गाडीला उशीर झाला असेल. ह्या सदर्न मराठ्याचा खटारा नेहमींच लेट असतो, नाहीं तर कुठें रस्ता वाहून गेलेला असतो, नाहीं

तर इंजनच नादुरुस्त असतें. अग बाई, पण आलाच कॉल. ( घंटा वाजते. ) ( केशवराव, राधाबाई व चंपाबाई प्रवेश करतात ).

**सुंदरा:**—या तुम्हीं केशवराव! राधाबाई, गुड् नाईट् गुड् नाईट् !वेल! हाउ डू यू डू.

**केशव:**—ओ क्वाइट वेल !

**इंदिरा:**—कसं काय राधाबाई! सोडलेंत म्हणावयाचें सातारा एकदांचें !

**राधा:**—होय बाई, तिथें अगदीं जीव कंटाळून गेला होता, तसेंच बाबांची देखील हेल्थ जरा बरी नव्हती म्हणून म्हटलें दोन महिने हवा पालट करूं या. सहज तुमच्याहि संगतीचा लाभ होईल !

**केशव:**—अन्डाउटेडली !

**इंदिरा:**—छान केलेंत. आतां तुम्हांला येथें अगदीं मौज वाटेल, दिवस पुरायचा नाहीं. या उन्हाळ्याच्या सुट्टीमध्यें तर इथें व्याख्यानें, नाटकें, सिनेमा शेंकडों करमणुकी असतात !कसं काय केशवराव, आपली प्रकृती ?

**केशव:**—साधारण बरी आहे. बरें तर सुंदराबाई, चला जाऊं या आपल्या बिऱ्हाडाकडे. गोविंदराव व गोपाळराव बाहेर टांग्यांत आहेत ते वाट पहात असतील.

**सुंदरा:**—खरें कीं काय ! वी फरगॉट देम ! चलायचें तर, तिकडे सर्व व्यवस्था केलीच आहे.

**राधा:**—थँक् यू—चला तर; बरें आहे इंदिबाई, आतां वरचेवर भेटी होतीलच. ( सर्व जातात )

---

# प्रवेश २ रा.



**सीन**—( चहाचें फराळाचें दुकान. पुढें बाकें वगैरे आहेत; टेबलाभोंवतीं चार खुर्च्या आहेत, लोक येतात जातात वगैरे. )

**पहिला:**—अरे, एक सोडा दे पाहूं. ( नोकर सोडा देतो. आणखी थोडे लोक येतात. )

दुसराः—ब्रेडबटर, एक भाजी, एक मिसळ, पाणी. चल ए, आण लवकर एक सिंगल.

तिसराः—अरे–छटाक बासुंदी, पापड, पुरी नि पातळ भाजी. कायरे, भजीं आहेत का ताजीं !

चहावालाः–हो ! हो ! या विश्रांतिधामांत वाटेल तें सामान ताजें मिळतें. कढईतलीं भजीं तोंडांत म्हटलें तरी तयारी !

दुसराः–अहो, थोडें श्रीखंड आणा पाहूं. ( तो आणून देतो. ) काय हो या वशा ! दुकान सुरू झाल्यापासून विसळल्या होत्या का कधीं ? दुसऱ्याची उष्टी मिसळ यांत पडली आहे. खारट लागतें आहे श्रीखंड !

चहावालाः–छे, छे ! वशा साफ विसळल्या होत्या ! सगळ्या हिंदुस्तानचा पुन्हां एक हिंदुधर्म करायला चहाच्या हॉटेलासारखा दुसरा रामबाण उपायच नाहीं. नुसतीं लेंकचरें झोडून काय होणार कपाळ ! थांबा आणतों.

दुसराः—अहो ! या सिंगलमध्यें भज्याचा तुकडा तरंगतो आहे. त्या पलीकडच्या मराठ्याचा कप होता वाटतें !

चहावालाः–छे, छे ! असं कसं होईल ! मीं स्वतः पाहिला होता कप.

पहिलाः–अहो, हा पलीकडला तर वडाखालचा चांभार आणि त्याला आमच्या शेजारीं बसवलात ?

चहावाला–रावसाहेब, तो जोडे नाहीं शिवीत, बूट बांधतो. बुटाला हरकत कुठेंच नाहीं !

तिसराः–अहो, त्याच्या पलीकडचा नाहीं पाहिला ! तो आपला गोंद्या न्हावी !

चहावालाः—छे, छे ! तो हेअरकटिंगसलुनवाला. तो खुंटावरचा नाव्हगंड नव्हे, त्याला काय झालें !

पहिलाः–आणि तूंरे लेका, भजींवाला नलशील ?

दुसराः–छे, छे, रिस्टोरंटवाला !

चहावाला—हो–हो, अलबत !

दुसराः–अरे ए गद्धया ! तुला लाज आहे का नाहीं ? न्हावगंड ब्राह्मणाबरोबर नि चांभारडा आमच्या वर !

**चांभारः**—असें भांडू नगा ! काका ! जरा बगा, हा जोडा तुमच्या पायाला येतो का ! चवदा बोटी है !

**तिसराः**—उद्यां लेका महार, भंगी आणून बसवशील ! कांहीं ब्राह्मण, चांभार आहे कीं नाहीं कांहीं तुला ! अरे ए पुतण्या चांभारड्या ! चल नीघ, नको जोडा !

**चहावालाः**—हां तोंड संभाळा, मला आपले महार, ब्राह्मण, चांभार या हॉटेलांत सारखेच ! घटकाभर सहभोजन झालें असें का समजानात ! त्यांत कसला ऐवढा विटाळ झाला ! मोठा दाखिवतो दिमाख !

**चांभारः**—शाबास, वारे माझा वाघ !

**सर्वः**—हरामखोर ! पाजी मनुष्य आहे. सहभोजन असें कां समजाना म्हणे ! अजून लेका इतक्या लाजा नाहीं सोडल्या. जरी आम्हीं इराण्याच्या इथें चोरून अंडीं खाल्लीं, गुत्त्यांत ब्रांडीची बाटली लंबी केली, रंडीच्या घरांत गच्चांडी मिळाली तरी, मूर्खा शेंडी तर आमची आहेना ! आमचें ब्राह्मणत्व गेलें कीं काय ! मोठा आला आहे लेकाचा सहभोजनतत्त्व शिकवायला ! तें कांहीं नाहीं; हॉटेलला बहिष्कार ! या वेव्याचा सूड घेतलाच पाहिजे ! चला हो. तें कांहीं नाहीं; सूड घेतलाच पाहिजे. नाहीं तर आम्ही करारी ब्राह्मण कसले !–( जातात )

**चहावालाः**—जा जा; सूड घेतात म्हणे पोकळकासोटे ! दिडकीच्या आळवाच्या देठींत गांवभोजन घालणारे बडबडे सूड घेतात ! नाहीं तर नाहीं मिळायाची तुमची दिडकी ! तुमच्यापेक्षां नाव्हगंड आणि चाभारडे शेकडों पटीनें जास्त ! चार पैशांची झोकून आले, कीं बसल्या बैठकीला दोन शेर चिवडा नि अडीच शेर भजीं लोळवतात. तुमच्या जिवावर थोडेंच हॉटेल आहे ! माझी बाजू नाव्हडे नि जोडेशिवाय यांनींच संभाळली आहे. माझ्या धंद्याच्या मानानें तर माझें असें प्रांजळ मत आहे कीं, यांच्यापेक्षां हेच जास्त पवित्र, श्रेष्ठ आणि दिलदार ! ( अर्र्र ! कोण आलें वाटतें. ) ( केशवराव प्रवेश करतात व समोर खुर्चीवर कॉफी पीत बसतात. )

**केशवः**—कवींना युवतींच्या मुखाशीं चंद्राची तुलना करण्याची कशी बुद्धि झाली हें त्यांचें त्यांनाच ठाऊक ! मला तर पदोपदीं अगदीं उलट अनुभव येत आहे.

पद—( अष्टमीचा चंद्र )

कामिनीचा वदन इंदू मज दावी भिन्नता ।। कविजनांनीं कल्पनांनीं वानिली जरि साम्यता ।। ध्रु० ।। चलनवलना कल्पनांना चेतवीता भासता ।। मोहकिरणें हृदयिं शिरुनी तेथ निर्मी प्रखरता ।। १ ।। वरुनि वरुनी क्षेम दिसतां अंतरंगीं कोळसा ।। ग्रीष्मसविता याहुनी का किरणिं धरितो प्रखरता ।। २ ।।

चला ! बिऱ्हाडाची एकदाची तर चांगली सोय लागली. अरे ए, एक डबल कॉफी आण पाहू.

**शंकरः**–( दुसरीकडून प्रवेश करतो व पलीकडच्या खुर्चीवर बसतो. ) अगदीं टायर्ड, टेरिबल हीट नाऊ एडेज ! अरे एक कप टी आण पाहूं ! तिच्या बरोबर आलेल्या त्या केशवरावाची चांगली ओळख झाली नाहीं. होईल आतां बाय अँड बाय. ( इकडे तिकडे वळून ) अरे, हा गृहस्थ काल मीं कुठें तरी पाहिल्यासारखा वाटतो ! मस्ट हॅव सीन सम व्हेअर. ( खुर्ची जवळ ओढून बसतो. ) कसं काय ?

**केशवः**–(अरे वा ! हा गृहस्थ जरा अतिप्रसंगींच दिसतो. ठीक आहे. आपणही करूं या थोडी याची गंमत ) कां आपण अगदीं दमून गेलेसे दिसतां ? मॉर्निंग एक्सरसाईज घेतां वाटतें ?

**शंकरः**—अहो, कसला आला आहे एक्सरसाईज आमचा ! आठ पंधरा दिवस मी माझ्याच धांदलींत आहें ! चाललेंच आहे ! ह्या घोड्यांच्या रेसीसनें आणि लग्नाच्या रेसीसनें मी आतां अगदीं हातघाईला आलों आहें.

**केशवः**–( ही स्वारी मोठी गमतीची दिसते. आणखी थोडी खुलवून तर पाहूं ! आपलें काय जातें. ) काय म्हणतां ?

**शंकरः**—म्हणतों काय ! पांच पंजवीस हजार तर, खिरापतीवारीं गेले. आणखी किती जातील देव जाणे !

**केशवः**—शाबास ! बरें, पण लग्नाचें नाहीं का अजून तुमचें कुठे जुळून आलें ? तुम्हांला हो काय कमी ! मुली लोळत येतील, लोळत !

शंकरः—छे, छे ! ही आपली उगीच म्हण पडली आहे झालें. कोण लोळत येते आहे नि काय ! शिवाय, कांहीं ज्या लोळत येतात त्या असल्या हिडिस-घाणेड्या असतात कीं, त्या लोळत आल्या कीं आपण पळत गेलें पाहिजे ! बस्स, बायको करीन तर, एम. ए. च करीन नाहीं तर निदान कालेजांत शिकत असलेली तरी करीन.

केशवः—पण कांहीं अजून कुठें तरी सूतदोरा जमलें आहे कीं नाहीं?

शंकरः—हो हो, आणला आहे डाव साधून ! तें जर जमलें तर आमच्या जोड्याला दुसरी जोडच नाहीं असें समजा.

केशवः—काय म्हणातां ! मग यंदा आहे तर ! काय हो, मुलगी केवढीशी आहे ?

शंकरः—मुलगी चांगली सोळा वर्षांची आहे. संसाराला योग्य आहे.

केशवः—यांत काय संशय, लग्न झालें कीं संसार सुरूच. बरें, पण तिचें नांव-गांव-वगैरे कांहीं—( गोपाळ प्रवेश करतो )

शंकरः—माझ्याबद्दल आपली बरीच सहानुभूति दिसते. ओ, सो काइंड ऑफ यू. ऐका तर, ती साताराची आहे.

गोपाळः—( अरर् ! हा गाढव ह्याच्याजवळ काय बरळतो आहे ! हा तर याचा प्रतिस्पर्धी ! )

केशवः—( जरा चपापतो ) काय म्हणतां साताराची ? सांगा सांगा पाहूं तिचें नांव, घरदार वगैरे ! काय साताराची ?

गोपाळः—( शंकरराव कांहीं बोलणार असें पाहून ) अहो, भलत्यावर एकदम असा विश्वास टाकणें बरें नव्हे.

शंकरः—छेरे, हे आपले मित्रच आहेत. ही इज माय फ्रेंड अँन्ड ए जन्टलमन. हें पहा, मी मागें साताराला गेतों होतों—

गोपाळः—थांबा, अहो पण माझा एक शब्द तर ऐका; थोडे थांबा !

शंकर—ओ नो हार्म ! सातारला तिची माझी गांठ पडली. तिचें नाक असें चाफेकळीसारखें आहे, कान जरा—

गोपाळः—( ह्यांच्यापेक्षां आंग्लूड आहेत. ) अहो शंकरराव ! असें भलतेंसलतें कांहीं तरी अनोळखी मनुष्याबरोबर एकदम बरळता याचा अर्थ काय ? यांची तुमची जन्मांत तरी गांठ पडली होती का ?

**शंकरः**—ओ नो, पुरेरे तुझी थट्टा ! तिची माझी अवचित गांठ पडली ! तिचें नांव हें आपलें पहा—राधाबाई.

**केशवः**—काय म्हणतां ! राधाबाई ! ( हें तर आमच्याच भावी कुटुंबाचें नांव. )

**शंकरः**—ती शाळेला जात असतांना तिला एका टांग्याची धडक लागली त्या वेळेस तिच्या जवळपास कोणी नव्हतें. टांगेवाला तिला लागलेलें पाहतांच पोलीस धरतील या भीतीनें पळून गेला. मीहि सहज त्या वेळेस येत होतों. तेव्हां हा प्रकार पहातांच मी धावून गेलों. तिच्या प्रथम तोंडावर पाणी वगैरे शिंपडून तिला सावध केलें ! तिचें तें सर्व अस्ताव्यस्त वस्त्र नीट करून तिची पायाची जखम मीं स्वतः बांधली, तिचें तें सर्व रक्त वगैरे बंद करून त्या सकुमार लाडकीला खांद्यावर घेऊन तिच्या घरीं पोहोंचाविलें. तिला घरीं पोहोंचविल्यावर तिला आलेल्या थकव्यानें मला तर ती अशी दिसली कीं, जशी कांहीं—

पद—( नैनन चैनन छिलन )

विजनि विपिनिं अलिनीं नलिनिं मना येइ तेविं ॥ छळुनि
छळुनि घेतलि अति गंधधुंद होवुनी ॥ ध्रु० ॥ चुंब चुंब
चुंबिलेंहि । दंतव्रण करोनी । विमलअधर दलकपोल ॥
यौवनमद हरुनि अरिनिं ॥ १ ॥

**गोपाळः**—ह्यांच्या ह्या डोक्यांत नुसता चिखल भरला आहे चिखल ! काय करावें या स्वारीला !

**शंकरः**—आणि त्या दिवसापासूनच एकमेकांची दृष्टादृष्ट झाली कीं-डोळेच सर्व काम उरकवूं लागले. अहाहा ! तिचें तें लाडकें लाडकें बोलणें, विनयशील हसणें, तो मोहक बांधा, कांहीं विचारूं नका. कधीं विसरणार नाहीं—तिला स्कंधावर नेत असतांना झालेला ब्रह्मानंद, तसेच ‘ तुम्हांला त्रास पडला हो ’हे तिच्या मुखांतून निघालेले शब्द. अहाहा ! काय सांगूं, अगदीं मजा आला ! केशवराव, अगदीं मजा आला !

**केशवः**—तिच्यावर तुमचें प्रेम आहे हें तिच्या बापाला ठाऊक आहे का ?

**शंकरः**—छे, छे ! मुळींच नाहीं. शक्यच नाहीं ! अहो, त्या थेर-ड्याशीं मला काय करावयाचें आहे ?

**गोपाळः**—अहो, आतां तरी तोंड बंद करा. सांगा, तिच्या मैत्रिणीकडून पत्रांची ने आण चालू होती म्हणून म्हणजे सुटलात !

**शंकरः**—व्हॉट ए, नाईस मॅन, एकझ्याक्टली ! तिच्या चंपा मैत्रिणीकडून प्रश्नांचीं उत्तरें करवून, तिचें दुसऱ्याशीं लग्न करणार नाहीं म्हणून वचन देखील घेतलें. म्हणून तर, त्यांना इकडे आणलें.

**केशवः**—काय म्हणतां ? हा तुमचा कट झाला होता तर—( हें काय नवीनच उपस्थित— )

**गोपाळः**—कां, नाहीं का पुरे झालें ? अहो, अजून तरी शुद्धीवर या. आज कांहीं चिलीम तर झोकली नाहींना ? नुसते म्हशीचे प्राणनाथ आहेत !

**शंकरः**—( रागानें ) हा मूर्ख नेहमीं माझा असा पाणउतारा जिथेंतिथें करतो. तूं मला शिकवतोस का बेवकूफ ! चल चालता हो इथून, नाहीं तर थोबाड रंगवितों. अहो इतकेंच नव्हे, तर आमच्या वाड्याच्या मालकाला देखील मीं सामील करून घेतला. कसला वस्ताद आहे तो ! कां तुझ्या बापाची कांहीं भीती आहे वाटतें ?

**गोपाळः**—नको माझ्या बापाची भीती, पण उगाचि त्या घराच्या मालकाचें आणखी नांव कां खोटें खोटें घेता ?

**शंकरः**—बस्स, चूप बैस बेअक्कल कुठला ! जाऊं द्या हो, या मूर्खाकडे काय लक्ष देता !

**केशवः**—बरें, पण त्या मालकाचें काय अंग आहे यांत आणखी—( चोर लेकाचे रेग्युलर गोल्डन गॅंग ! )

**शंकरः**—अहो, म्हणजे तिच्या बापाला न कळत कोर्टिंग ठीक जुळेल. रात्रींबेरात्रीं मालक दरवाजा उघडील. कां, आहे का नाहीं मी पक्का कावेबाज आणि धूर्त ?

**गोपाळः**—कोपरापासून नमस्कार बाबा या तुझ्या धूर्तपणाला ! वारे—बैल ! धन्य आहे बाबा तुझी ! कोणत्या गाढवानें तुझे पेपर तपासले नि डिग्री दिली तें त्याचें त्यास ठाऊक ! !

केशवः—काय हो, पण तुम्ही तिच्या बापालाच
घालानात !

गोपाळः—( याला चोरट्या प्रेमाची हौस दिसते.

शंकरः—अहो, त्या थेरड्या गोविंदरावाला कळत
चित् फिसकटायचें.

गोपाळः–( अर्र्र, या बैलानें तिच्या बापाचें देखील

केशवः—( उठून उभा राहतो. ) ( आतां शंका
तिच्या बापाचें नांव गोविंदराव म्हणालात ?

शंकरः–कां ? त्या वृद्ध माकडाची आणि तुमची

केशवः—अहो शहाणे ! माझी आणि त्या सर्व
ओळख आहे आणि तुम्हांला पक्कें सांगतों कीं, तुमच्या
शून्य अचरटाला तो कधीं आपली मुलगी देणार नाहीं,
हि ढुंकून अशा ठोंब्याकडे पहाणार नाहीं. समजलात

शंकरः—( गोंधळतो ) अरे वा ! तुम्ही देखील
अरे वाः याला थट्टाच वाटते ! अहो पण—

केशवः—पण नाहीं बीण नाहीं, बऱ्या बोलानें
यांतच शहाणपणा आहे.

शंकरः—अरे वा ! याला थट्टाच वाटते ! अहो,
खरें—हें पहा—

केशवः—अहो खंदक ! ऐकलें तेवढें पुरे. तुमच
सुद्धां नको ! तिच्याबरोबर मी—मी लग्न लावणार आ
झालें, तुमचे सर्व डावपेंच कळले. आतां चांगला
तर, नमस्कार. ( आधीं दुसरें बिऱ्हाड बदललें पा
जातो. )

गोपाळः—(दोघे एकमेकांकडे पाहतात. शंकररा
अहाहा ! शंकरराव, बहार केलीत बोवा ! शाबास, खूप
अगदीं स्वारी भरली का म्हणाना ! याला म्हणावें क
णावें ज्ञान, धूर्तता आणि कावा ! आपल्याच प्रतिस्पर्ध्या
सांगण्याची ही अजब करामत ही काय कोणाच्या बापाच

**शंकरः**—अरे वा ! तूंही थट्टाच करतोस वाटतें ? अरे गोपाळ, खरें का, तूं थट्टा तर नाहींना करीत ?

**गोपाळः**—( आतां काय याच्यापुढें शंख करायचा. ) आतां काय सांगूं तुम्हांला ! ( हें देखील याला कळेना ).

**शंकरः**—(जरा सलगीनें) अरे, पण मला हाच प्रतिस्पर्धी म्हणून स्वप्न का पडलें होतें ? तूं प्रथम कां नाहीं मला मोठ्यान्दा सांगितलेंस ? म्हणजे असा घोटाळा तरी झाला नसता !

**गोपाळः**—पण तुमचे कान कुठें होते ठिकाणावर ? तोंडांतून शब्द बाहेर पडतो न पडतो तोंच मीं सारखा त्वंपुरा सुरू केला ! पण ऐकतो कोण लेकाचा ! मारे तुम्ही सरबत्ती सुरू केली, अगदीं पाऊस पाडला !

**शंकरः**—अरेरे, झाली खरेंच स्लिप ऑफ टंग !

**गोपाळः**—ही का स्लिप ऑफ टंग ? सबंध बत्तिशी घशांत गेली तरी स्लिप ऑफ टंगच का ?

**शंकरः**—आतां मागला कीस कशाला ! दुर्दैव माझें झालें ! बरें पण गोपाळ ! पहा बोवा पुन्हां जुळलें तर !

**गोपाळः**—जर एवढें तोंड संभाळलें असतें, तर कसें पण सुरळीत जमत होतें. पण तुमची टंग आलीना मध्यें !

**शंकरः**—गोपाळा ! आतां मला किती बोंचून खाशील ? झालें एवढें शासन मला पुरेसें नाहीं का झालें ?

**सुंदराः**—( लगबगीनें प्रवेश करते. ) अहो शंकरराव; शंकरराव ! तिकडे काय गडबड चालली आहे, नाहीं कां आली तुमच्या कानावर ? अहो, केशवराव बिऱ्हाड बदलतात म्हणे. म्हणजे ! त्याच्या कानावर आपला प्लान गेला कीं काय ? काय गोपाळा, तुझ्याकडून तर नाहीं ना कांहीं शब्द गेला ? कांहीं बोललास तर नाहीं ना ?

**गोपाळः**—झाला खरें येवढा अपराध माझ्याकडून ! अरेरे ! केवढा घात केला या गाढवानें ! आतां काय करावें ! काय हो, माझी अक्कल शेण खायाला गेली ! माझी दांतखिळी कां हो नाहीं बसली त्या वेळेस !

**शंकरः**—हें कायरे गोपाळ असें ! छे, छे, तूं नसशील बोललासरे ! गोपाळ, उगीच कां तूं आपल्याला बोलून घेतोस ?

**गोपाळः**—थांबा हो, तुम्हांला काय त्याचें. मी नाहीं तुम्हांला कांहीं म्हणत. अरेरे, काय हो टोणगा मी. तरी मधून मधून शंकराव मला खुणवीत होते बरें ! पण मला बोकडाला तारतम्य पाहिजेना ! झालें खरें हें असें !

**शंकरः**—असें कायरे हें गोपाळ ! हें कायरे गोपाळ !

**सुंदराः**—बरें तें जाऊं दे. या वादांत नको वेळ. मीं घेतलें आहे थोडेंसें थांगरून ! आतां थोडें निवळलें आहे तें.

**शंकरः**—ओ थँक् यू ! ओ थँक् यू ! सुंदराबाई, सांगा पाहूं काय बतावणी केली ती ?

**सुंदराः**—अहो काय नि काय ! एक का आहे ? केशवरांनीं घराच्या मालकाबद्दल व तुमच्या बद्दल कुजबूज सुरू करतांच मी जशी त्या गांवची नाहीं असें त्यांना दाखविलें. इतकेंच नव्हे, तर उलट तुमच्या वर्तनाबदल वाटेल तशा तुम्हांला शिव्या देखील दिल्या आणि कसाबसा त्यांचा विश्वास माझ्यावर बसविला. त्यांना विचारलें कीं, आमच्या क्लबच्या मध्यें जागा आहे येता का तिकडे राहयला ? असें विचारतांच त्यांचा रुकार आला ! मग काय उशीर, लागलीच तिकडे व्यवस्था कराविली.

**शंकरः**—स्त्रियांचें चरित्र आणि पुरुषांचें भाग्य कोणालाहि कळणार नाहीं हें अगदीं खरें. वहावा, वहावा, अगदीं वेलडन् वेलडन् !

**पद**—( मी गरलमुखी )

ह्या चतुर अंगना ॥ कल्पतरुहि लाजविती पुरउनिया सकल
कामना ॥ ध्रु० ॥ मधुर मधुर कपट गिरा ॥ मिश्र करुनि
स्मित रुचिरा ॥ जिंकितील सकलधरा प्रबलमोहना ॥ १ ॥

माझ्या देखील प्रथम मनांत हेंच आलें होतें.

**गोपाळः**—हां शंकरराव, आलात का पुन्हां बेतावर !

**शंकरः**—अरे तसें नव्हेरे ! मी आपलें उगीज म्हटलें तें. हें पहा, तूं माझें एवढें काम केलेंच पाहिजे. मी तुझे उपकार मुळींच ठेवणार नाहीं. शिवाय तुझ्या प्लॅनमध्यें ढवळाढवळ करणार नाहीं, मग झालें ना ?

**गोपाळः**—हां मला येवढेंच पाहिजे, ठीक आहे. संभाळा आतां लागतों मी तयारीला. ( जातो )

**सुंदराः**—कोण हा त्रास शंकरराव या भानगडीचा ? खरोखर मीं सांगितलें तसें ऐकलें असतें, तर मुळीं देखील खटपट पडली नसती. एव्हांना संसाराला सुरवात देखील झाली असती हो ! तुमचा नाहीं म्हणायांत दोष. आमच्यांतले मोठमोठे लेक्चराच्या अवसानांत आले कीं, अचं करावं, तचं करावं, प्रौढ विवाह करावा, पुनर्विवाह करावा, वाटेल तसें मेले बरळतात नि आपल्यावर प्रसंग आला कीं, लागले मेले तोंड खुपसायाला ! लेक्चरें झोडतांना गांजा—चंडोल ओढून येतात वाटतें !

**शंकरः**—अहो तसें नव्हे हो ! हें पहा. असें नव्हे—मी म्हणतों, संकटाशिवाय सुखाची किंमत नाहीं. अहो हें नाहीं साधलें, तर आहेच मग क्लबाचें संधान !

**सुंदराः**—पुरे झालें संधान ! पूर्वेकडे शत्रु नि पश्चिमेकडे संधान ! करावयाचें काय तें ? तुम्हीं म्हणतांच म्हणून ऐवढी खटपट करतें; पण जर का हें साधलें नाहीं तर मी सांगतें तसेंच झालें पाहिजे.

**शंकरः**—ठीक आहे, हें घ्या वचन. तुमच्या पॅरिसफॅशन क्लबांतील हंसीबरोबर बंडगार्डनांत विहार करायला हा हंस एका पायावर तयार आहे.

**सुंदराः**—ठीक आहे. चला तर तिकडे कुठवर आलें आहे तें आधीं पाहिलें पाहिजे.



# अंक दुसरा.



## प्रवेश १ ला.



सीन—( इंदिरेची तसबिरी, टेबलें, खुर्च्या, आरसे यांनीं शृंगारलेली जागा, विजेची घंटा, टेलिफोन, ग्रामोफोन, घड्याळ, फुलझाडें वगैरे. ग्रामोफोन वाजत आहे व तारा, यमुना, दामिनी, राधा, चंपा इंदिरा ऐकत आहेत असा पडदा उघडतो. )

**इंदिराः**—किती गोड गाणें आहे हें ! किती मधुर आवाज हा ! तान तरी किती सफाईची, नाजुक आणि मोहक आहे ही ! खरेंच बाई, हीं गाणीं, तशींच कांहीं गोहरचीं गाणीं ऐकूं लागलें म्हणजे अंगावर रोमांच उभे राहतात हो ! ही बाई अवाजाची देणगी पूर्वपुण्याईचीच असते ! किती गोड आवाज तरी हा ! जशी कांहीं गळ्यांत कोकिळाच बसली आहे ! छे बाई ! तारे, लाव कीग आणखी दुसरी एखादी प्लेट.

**ताराः**—आतां दुसरी कोणची प्लेट लावूं बरें ? महमदहुसेन, खाजाहुसेन—कोणाची लावूं ?

**यमुनाः**—त्या नकोत गडे मुळीं देखील लावूंस ! मला त्या थंडीनें हुडहुडी भरल्यासारख्या ताना मुळीं देखील आवडत नाहींत ! काय मेला त्या य् य् य् य् चा भडीमार ! अगदीं मेलें सळो का पळो करून सोडतात !

**दामिनीः**—बसली जागा तरी पुरे होते का ! किसणीवर खोबऱ्याचें भक्कल किसावें तसें मेले ह्या भिंतीपासून त्या भिंतीपर्यंत उलथेपालथे होत असतात. लहान मुलें काठीचा घोडा करतात, तसें मेले य् य् य् य् च्या तानेसरशी तंबुऱ्याचा घोडा घोडा करून दिवाणखान्यांत फेऱ्या घालीत नाहींत हें नशीबच म्हणायचें ! गाणें थोडें नि धिंगाणाच फार !

**इंदिरा!**—तूं म्हणतेस तें अगदीं खरेंच गडे! ह्यांचें गाणें म्हटलें म्हणजे तबला जुळवाजुळवींत नि तंबुऱ्याच्या खुंट्या पिळण्यांतच सगळी रात्र जाते. मेल्यांना आधल्या रात्रींच खुंट्या पिळायला बसवावें म्हणजे दुसऱ्या दिवशीं तरी सुरवातीपर्यंत तबला नि तंबुरा लागेल! छे बाई, ह्या ग्रामोफोननें तो तरी त्रास चुकवला!

**ताराः**—मग काय आपल्या मराठी नाटकांतलीच प्लेट लावूं का?

**दामिनीः**—हं! चालेल! काय ग! या वेळेस ते भाऊराव का भावडे कोण ते–जिवंत असते तर त्यांचें गाणें देखील कंपनीनें घेतलें असतें नाहीं का?

**यमुनाः**—हो–हो, यांत काय संशय! अजून देखील नाहींत कीं काय त्यांच्यासारखे?

**तारा**—'पुष्पपराग' लावूं का 'शारदेचें' लावूं?

**इंदिराः**—तीं नकोत गडे! पुष्कळ ऐकलींत मेलीं; बालगंधर्वांचेंच गाणें कां लाविनास!

**ताराः**—बरें! 'अरसिक किति हा शेला' हेंच लावतें तर!

**इंदिराः**—छे; छे; तें नको बाई तेवढें; अगबाई शेला, अगबाई शेला, अगबाई शेला; हत् मेलें फुटलें कपाळ! किती तरी मेला ऐकायचा तो! तें मेलं शेल्याचें दळण सुरू झालें म्हणजे संपतां संपत नाहीं! तें नको गडे! त्याचीच ती भैरवी का लावीनास, मला बाई फार मनापासून आवडते ती! लाव कीं ग तारे तीच!

**यमुनाः**—इशः, ती, 'नका टाकून जाऊं डावा डोळा'? आहे खरेंच गोड गडे! पण इथें नको बाई कोणी तरी ऐकेल!

**इंदिराः**—कोण बसलें आहे मेलें ऐकायला. अग, अशी एकीमेकींत गंमत नाहीं करायची, तर मग करायची तरी कुठें? नॉनसेन्स! लाव ग तारे तूं आपली; अग गंमत थोडा वेळ! पुरुष बरोबरीचे बसले म्हणजे नाहीं का मेले वाटेल-तसा चारगटपणा करीत? कोण बसलें आहे इथें यायला! आणि जरी आलें तरी काय आपण कुणाच्या दबेल थोड्याच आहोंत! नो; नो; दॅट वॉंट डू! वीमस्ट हॅव फ्रीडम, गोऑन तारे डीअर गोऑन! लेट्स हॅव ईट!

ताराः–कमलाँगदेन ! ( ' नका टाकून जाऊं ' ची प्लेट सुरू होते. त्या मधून मधून टाळ्या वाजिवतात. ) अवाज कसा अगदीं कोकिळेसारखा आहे हो ! फिरतो गडे कसा भिंगरीसारखा ! आवाज अगदीं जनानी आहे; गाणें ऐकलें म्हणजे म्हणणारा पुरुष आहे, कीं बायको आहे हें मुळीं देखील समजायचें नाहीं ! गाण्याचें शेवटचें कडवें ' तुम्हि केला माझा कां कंटाळा ' किती लाडकें लाडकें नि बहारीचें आहे पण ! कां इंदिराबाई, तुम्ही कां अशा नाक मुरडता ? कां तुम्हांला नाहीं का आवडलें गाणें हें ?

इंदिराः–तुम्ही कांहीं म्हणा ! पण हा बालगंधर्वच लावला होतास का ?

ताराः—इश्श्ः म्हणजे ! हें पहा तबकडीवर नांव देखील आहे.

इंदिराः—मग गडे प्लेटचा अवाज आज कां बरें नाहीं चांगला आला ? सगळा मधून मधून बेसूर ! प्लेटवर तो साउंडर लावायच्या आधीं चांगला पाहिला होतास का ? आज मुळीं देखील अवाज चांगला नव्हता हो ! कांहीं तरी चुकलें आहे आज !

ताराः—हो–होतर; हा पहा साऊंडर इनटॅक्ट आहे.

इंदिराः—छे, प्रथम प्रथम थोडा बरा होता, पण मागून सगळा बेसूर ! मुळींच आवाज निघेना !

ताराः—( साउंडर पाहते ) होयग होय ! म्हणालीस तें अगदीं खरें ! गाणारा ग काय करणार ? साउंडरचा स्क्रूच मुळीं ढिला आहे !

यमुनाः—लांपट झाला असेल झालें ! पुरे बाई आतां त्याचें गाणें ! दुसरीच प्लेट लाव.

इंदिराः—आहेत कुठे आतां दुसऱ्या आपल्यापाशीं चांगल्या प्लेटी ? यमुने, आपल्या क्लबांत पूर्वीं किती तरी प्लेटी होत्या हो ! चांगल्या चांगल्या तबकड्यांचा केवढा तरी स्टॉक होता, पण आतां एक देखील चांगली असेल तर शपथ. आतां दोन–तीन शिवाय करून सगळ्या एकंदरींत चरे पडून खरवडून गेल्या आहेत. पुरे कर आतां ग्रामाफोन हें ? आपणच आपलें डानासिंगचें लेसन शिकूं या.

यमुनाः–हं, चला तर लवकर आटपूं या !



इंदिरा:—तुमचें गाणें नि हें ड्रिंक फारच प्लेझेंट लागलें बाई !




इंदिराः—

पद—( कन्हैयाखेलोहारी )

नाचूं या गडे खेळूं सारीं ॥ मनीं हौस भारी ॥ ध्रु० ॥
चंद्रबिंब, रविबिंबहि मंगळ ॥ शनि गुरु ध्रुव निर्धारी ॥
अनंत तारक पुंजहि नाचे ॥ कुंभिनि व्योमविहारी ॥ १ ॥
चंचल चपला, सिंधुतरंगहि ॥ पवन वनांमाझारीं ॥ नाचे
डोले अंबुजसंघहि ॥ स्फटिकोपम कासारीं ॥ २ ॥ ज्ञान-
विभूषित आंग्लभूमिच्या ॥ नाचति गे नरनारी ॥ हर्षवर्त-
ना नर्तन एकचि ॥ नाचत सृष्टी सारी ॥ ३ ॥

यमुनाः—खरेंच गडे, भाग्यवान हो लोक ते! त्यांच्या खेटराची नाहीं सर यावयाची आम्हांला ! नाहीं तर पहा आमच्याकडचे बायका-पुरुष ! मेलीं दिवाभीतें पडलीं आहेत अंधारांत घोरत अजून !

ताराः—चालले आहेत मेल्यांचे अजुनि सोवळ्या—ओवळ्याचे वादविवाद नि स्त्री-शिक्षणाचे खल ! काळतोंडे मेले ! !

दामिनीः—पिचपिच्या डोळ्यांच्या आंजीबाईचें चाललें आहे निर्लेपाचें आणि धान्यफराळाचें रडगाणें ! एक दिवस दिलें बाई मी घरच्या आजीबाईला उत्तर. तिनें सारखें धान्यफराळ, धान्यफराळ ! भाजून कर, म्हणून डोसकें उठवलें. तिला सांगितलें, सटवे ! कालच वाण्याच्या दुकानाला आग लागली होती आणि वाणी अर्धा मेला झाला आहे भाजून, आतां आपले घरांत सगळें निर्लेपाचेंच आहे हो !

इंदिरा—अरेरेरे, हॉरिबल ! चला, आपण सिनेमांतल्यासारखा डॅन्स करूं या. ( सगळ्याजणी एकमेकींना कवटाळून डॅन्स करतात. ) व्हेरी फाईन ! व्हेरी फाईन !

पद—( प्यारि छलबल है )

ही गलबल, गमे करि कलकल, कमलदलिं, कोलाहल मराल-
माला ॥ ध्रु० ॥ शोभे कुंतल, कुरल जणु भृंगावलि आलि

मरंद लोभेंहि माला ॥ १ ॥ रुणझुण निनाद कंकणिं पैं-
जणीं ॥ आनंदिआनंद आणि मनीं ॥ स्वर्गसुखासि मात
गडे केली निभ्रांत ॥ सुरसंघ नभांत ॥ बघ रुसला ॥ पाहुनि
या ॥ मधुलीला ॥ २ ॥

( घंटा वाजते व सर्वजणी पुन्हां नीटनेटकें मांडून ठेवतात. इंदिरा टेलिफोन मध्यें बोलते.) हू इज देअर ? व्हाट? हू इज देअर? ओ ! कम अलाँग ( इतर मुली बरें तर, येतों आम्ही आतां; असें म्हणून शेक हँड करून जातात. सुंदराबाई प्रवेश करते. )

सुंदराः—अॅलो ! आज तुमची जॉली पार्टी होती वाटतें ? मी सगळें ऐकत होतें तिकडून. पण म्हटलें बाई, मला सगळ्या जणी लाजतात तर उगीच आपण येऊन कशाला तुमचा विरस करा ! बाकी त्याच्यांत काय एवढें लाजायला हवें! मी सगळी तुमच्यापेक्षां काय ती दहा पंधरा वर्षांनींच वडील ना ! बाकी मी आतां येत जाणार हो नेहमीं ! तुम्हांला तरी मला वगळून कसें काय बरें वाटतें. ‘ हा पॅरिस फॅशन लेडीज पायोनियर रिक्रीयेशन क्लब ’ उगीच तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करायला नाहीं हो म्रीं काढला ! हा अगदीं निव्वळ पॅरिस फॅशन रिक्रीयेशन क्लब आहे ! दुसऱ्याकरितां आम्हीं काय म्हणून खटपट करावयाची ? कुठें पोलकीं शिवायचीं, परकर शिवायचे, इंग्रजी शिकायचें, मिडवाइफ्री शिकायची करायचें काय नि कोणाचें मेलें इथें खोळंबतें आहे! अशा मेल्या संस्था नि सदनें पुण्याला थोडीं का आहेत. आतां तर बायकांची युनिव्हर्सिटी देखील होणार म्हणे ! हं ! आणला आहे भोग आम्हां बायकांभोंवतीं समळ्यांनीं झालें ! डोंबल मेल्यांचें ! पण हें पहा बाई काय तें. आगींतून निघून फोपाट्यांतच पडायचें ना ! तें कांहीं नाहीं. आम्ही साफ कोणाकरतां कांहीं काम करणार नाहीं. तें स्त्री-शिक्षण, बालसंगोपन आणि विश्वबंधुत्व सगळें आम्हांला हवें आहे; ठीक आहे, पण हा ‘ पायोनियर ’ त्याकरितां निर्माण केलाच नाहीं. झक मारते ती देशसेवा! कोण मेला नसता कहार! चार दिवस ज्यांना जिवाला सौख्य लावून घ्यायचें आहे, ऐषआराम भोगायच्या हौशी आहेत, ज्या लोकापवादाच्या बागुलबोवाला भीक घालणार

नाहींत. अशाच गुलहौशी चार तरुणींनीं, पोक्त बायकांनीं एके ठिकाणीं निरनिराळीं जगांतलीं कौतुकें पहायचा नि अनुभवायचा हा क्लब आहे. ज्यांना दुसऱ्याच्या दडपणाखालीं नि टेहेळणीखालीं कुचंबत पडायचें आहे त्यांना खुशाल बोर्डिंग, आश्रम, नि सदनें यांच्याकडे जाऊं द्या म्हणावें. धिंडका! आमचा आपला हा खराखुरा ' रिक्रियेशन पायोनियर ' आहे. ( घड्याळ पहाते ) अग बाई, बराच वेळ झाला. मला आतां केशवरावांचा कॉल आला आहे तिकडे जातें. तसेंच ते वामनराव, आज तुझ्या व्हिजिटला येणार आहेत हो ! तुला आपली आधींच सूचना देऊन ठेवतें.

**इंदिरा:**—होय कां ? लेट् हिम् कम्.

**सुंदरा:**—मीं सांगितलेलें आहे ना पण सर्व लक्षांत ? लेट मी सी व्हॉट यू डू.

**इंदिरा:**—सगळें लक्षांत आहे. पहा तर खरी माझी करामत. मग म्हणा.

**सुंदरा**—ऑल राईट देन, आय टेक युअर लीव्ह. पाहातें आतां, गुड नाईट. ( जाते. )

---

# प्रवेश २ रा.



**सीन**—(पायोनियर क्लबांतील केशवरावांचें बिऱ्हाड–केशवराव, राधा, चंपा, गोपाळराव व शंकरराव. )

**केशव:**—आतां कुठें आमचा जीव खालीं पडला. वेल्, राधाबाई, आपल्या ह्या बिऱ्हाडाची जागा चांगली आहे ना ?

**राधा:**—ह्यापेक्षांही एखादी चांगली जागा नव्हती का दुसरी ? मला वाटतें आपली पहिलीच जागा उत्तम होती.

**केशव:**—आपल्याला पहिली जागा ठीक होती खरेंच. पण मला मात्र नव्हती.

**राधा:**—म्हणजे ? आपण काय बोलतां हें ?

**केशव:**—जें मला वाटलें तें स्पष्ट बोललों. कां तुम्हांला कां लागलें बरें ? तुमची आणि शंकररावांची ओळख आहे ना ?

राधाः—कां बरें ? शंकररावाशिवाय आणखी बरेच माझ्या ओळखीचे फ्रेंड्स आहेत; मग त्यांत काय झालें ?

केशवः—नाहीं, झालें नाहीं कांहीं; पण आपलें व त्यांचें बरेंच सलगीचें संभाषण होऊन वचन देखील झालें असें ऐकतों इतकेंच ! मला जर हें आधींच कळतें, तर ह्या घरांत प्रथमच उतरतों ना. आतां काय त्याचें !

राधाः—चला, मुळीं देखील माझ्याशीं बोलूं नका. एखाद्याचा उगीच असा पाणउतारा करणें म्हणजे ठीक नव्हे.

केशवः—हो, पण शंकररावाचें नांव काढतांच तुला कां राग यावा ? ज्याला कर नाहीं त्याला डर तरी कशाला पाहिजे. पाणउतारा कसला आला आहे त्यांत ! पण राधे, माझी तुला एवढीच विनंति आहे आणि ती तूं मान्य केली पाहिजे. त्याच्या व माझ्या गुणावगुणांचा विचार केल्याशिवाय एकदम मनाचा कोणताही ग्रह किंवा कल निश्चित करणें हें अविचाराचें नाहीं का होणार ? मनुष्याला आशा दाखवून निराश करणें यासारखें दुसरें खेदजनक कोणतेंच नसेल. येथील कोर्टातील खटल्याची काळजी मला रात्रंदिवस आहे, तरी पण तुझ्याकडे पाहिलें म्हणजे थोडा तरी मनाला विसांवा वाटत असे !

पद—( सेव्य संसार हा )

जाई चिंताभ्र पटल मम झणि विखरुनि ॥ हास्य मधु
पवन त्या दे दिगंतीं लोटुनी ॥ ध्रु० ॥ सौख्यरविबिंबतें ॥
पुनरपी उगवुनी ॥ उभयतां धवल किरणिं ॥ शांतविल
झणि फिरुनि ॥ १ ॥

कोर्टांतून माझ्या केसचा कांहीं निकाल लागो, माझ्या इस्टेटीची, प्रॉपर्टीची वाटेल ती विल्हेवाट होवो. केवळ तुझ्या सहवासानें, संगतीनें मी वरील गोष्टीला मुळींच भीक घालणार नव्हतों. अशा रीतीनें सर्वस्वीं तुझ्यावर भार घालून बसणाऱ्याचा हिरमोड करणें तुला तरी आवडतें का ? पहा, याचा तुझा तूंच विचार कर.

**राधाः**—( हें पहा बाई काय तें ! यांच्याशीं मीं लग्न केलेंच पाहिजे असा कांहीं मीं बॉंड केला आहे कीं काय ? )

**केशवः**—ही अजून माझ्यावर सुप्रसन्न होत नाहीं. चंपे, तूं तरी चार समजुतीच्या गोष्टी हिला सांग. मी थोडा पोस्टऑफिसांत जाऊन येतों; आतां हें पत्र गेलेंच पाहिजे. ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा.



**राधाः**—पुरुषांची जात भारीच अप्पलपोटी असते हो. काय ग चंपे ! पुरुषांनीं तेवढी आपल्याला चांगली सुंदर रूपवान अशी बायको निवडावी आणि बायकांनीं वाटेल तसे हेमाडपंत पति करावे हा कुठला न्याय ? खांद्यावरच्या डोंगरावरहि बौद्धकालचीं वाटेल तसलीं वांकडीं तिकडीं लेणीं मला मुळींच आवडत नाहींत. राजा रविवर्मा फॅशन ब्यूटीज जशा पुरुषांना पाहिजेत तशाच प्रकारचे रूपवान तरुण हस्बंडस आम्हांलाहि पाहिजेत. काय ग चंपे, हे केशवराव कशास कांहीं ठिकाण नाहीं तोंच एवढी धुसफूस व दुसऱ्यावर अंमल चालवायला पाहातात, मग लग्न झाल्यावर हे मला बुरख्यांतली बीबी करून का ठेवणार ? नाकांत कडी अडकवलेल्या दरवेशाच्या अस्वलासारखी दरवेशी नवऱ्याच्या मागें रात्रंदिवस फिरणारी कोणी दुसरी अस्वलीण खुशाल पत्करा म्हणावें. मला नाहीं हो पतकरायचें!

**चंपाः**—मी हें भाकीत केव्हांच केलें होतें; पण म्हटलें, आपण कशाला यांत पडा. आपोआप ओघाओघालाच येईल तें—यापेक्षां शंकरराव किती तरी—

**राधाः**—पण शंकररावांचें तरी हें असें सांगणें बरें दिसतें का तुला ?

**चंपाः**—अग, पण त्यांच्याकडून कांहीं तरी आपल्याला नक्की कळल्याखेरीज एकदम त्यांच्याबद्दल शेरा तरी कसा द्यावा. ह्या चुरशीच्या सामन्यांत हे एकमेकांवर असें तोंडसुख घेणारच.

**राधाः**—चल, बोलूं नकोस अगदीं त्यांच्याकडचें.

**चंपाः**—तीच तर त्यांच्या स्वभावाची गंमत आहे. आपलें काम साधण्याकरतां ते असें वेड पांघरतात, कीं खऱ्या वेड्याला देखील तसें करतां येणार नाहीं. भारीच बाई गंमती थट्टेखोर स्वभाव हो त्यांचा !

**राधाः**—( गोपाळराव भीत भीत प्रवेश करतो ) कोण गोपाळराव ! तुम्हांला तोंड तरी आहे का इथें यायला ? शंकररावांनीं उगीच वाटेल तसें एखाद्याच्या मनाला लागेल असें वर्तन करावें हें बरें दिसतें का तुम्हांला ?

**चंपाः**—अहो, पण तुम्ही आधीं आलांत कसे इकडे ? गोविंदरावांनीं किंवा केशवरावांनीं जर तुम्हांला इथें पाहिलें तर ?

**गोपाळः**—अंः त्याची नको तुम्हांला काळजी. ते दोघेही आतांच बाहेर पडले.

**राधाः**—बरें, जाऊंदे ते गेले तर. पण तुम्ही कशाला आलांत—जा—साफ जाऊन त्या शंकररावांना सांगा, कीं या उपर तुमचा एक शब्द देखील मला ऐकायचा नाहीं जा साफ जाऊन सांगा. आणि त्यांना पुन्हां चूक न करण्याबद्दल बजाऊन सांगा—आपला प्लॅन दुसऱ्याला सांगून एखाद्याला असें पेचांत आणणें ह्याला म्हणावें तरी काय.

**चंपाः**—( गोपाळरावास एकीकडे ) गोपाळराव ! खरेंच बाई तुमचे शंकरराव अगदींच कीं हो शतमूर्ख दिसतात ! छेः हें कसें जुळणार मग ?

**गोपाळः**—अग, तूं जुळवलंस म्हणजे जुळतें सगळें, हें घे तुला. ( दागिना देतो. ) असेना का तो शतमूर्ख !

**राधाः**—अशी एकमेकांशीं काय चालली आहे कुजबूज? काय असेल तें स्पष्ट बोला.

**गोपाळः**—मी बोलतों स्पष्ट, पण आधीं मला क्षमा करण्याचें वचन दिलें पाहिजे. पहा गैरसमजूत कशी होते ती !

**राधाः**—मीं कसली क्षमा करावयाची नि कसली गैरसमजूत झाली ? बोला बाई काय तें लवकर.

**गोपाळः**—माझ्या मूर्खपणाबद्दल त्या बिचाऱ्या शंकररावाला शासन ! माझ्याकडून चुकीनें ही गोष्ट केशवरावाला कळली याबद्दल मला राहून राहून पश्चात्ताप होतो. आतां पण काय उपयोग !

**चंपाः**—(पहा ! पहा ! वस्तादगिरी. कसें आपल्यावर सर्व फिरवून घेतलें.)

**गोपाळः**-अरेरे ! पण मला हो केशवरावांचें हें नातें काय ठाऊक ? नाहीं तर मी तोंडांतून ब्र काढला नसता.

**राधाः**—काय म्हणतां हें ? म्हणजे ! शंकररावांचें ह्या बाबतींत मुळींच अंग नाहीं तर ! होय, का ?

**गोपाळः**—छे हो, ते कशाला सांगून सवरून आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतील. त्यांच्यासारखा दिलदार लाखांत एक ! आतां त्यांचा स्वभाव अतिशय थट्टेखोर-गमत्या आहे ही गोष्ट निराळी. बाकी, ते एखाद्या वेळेस तर इतकी मस्करी करतात, कीं ही खरीच मस्करी आहे, कीं हे हाफ् मॅड आहेत अशी दुसऱ्याला भ्रांति पडते.

**राधाः**—ओ. आय लाईक दॅट जॉली टेंपर. इश्श बाई, व्हॉट ए मिस्टेक. केवढी गैरसमजूत झाली आमची. छे, छे ! त्यांची तर मग माफी मागितलीच पाहिजे. गोपाळराव, पण तुम्हीं मात्र अशी चूक पुन्हां करूं नका.

**गोपाळः**—आतां कसली करतों असली चूक म्हणा !

**राधाः**—शंकररावांना माझा निरोप जरूर सांगा, कीं मी आज सायंकाळीं बागेंत येईन तिथें जरूर मला भेटा.

**गोपाळः**—ठीक आहे. पण ते देखील तुमची सत्त्वपरीक्षा पाहणार आहेत त्या वेळेस ते अगदीं पांड्या उधळणार आहेत ( अकलेच्या) असें माझ्याजवळ म्हणत होते. त्यांच्या वेड पांघरण्याची, तशीच थट्टेखोरपणाची ते अगदीं रेलचेल करणार आहेत. पाहतों आतां तुम्ही ओळखता का तें!

**चंपाः**—( त्यांच्यापाशीं गाढवपणाची मात्र रेलचल आहे. ) ( केशवराव दार ठोठावतो. आंत गर्दी होते. ) गोपाळराव ! चला. चला. इकडे असे लपा लवकर, नाहीं तर त्या गोविंदरावांच्या कानावर जायचें.

**राधाः**—लपा, लपा, लवकर ! दोघेंहि प्राण खातील नाहीं तर. लपा, लपा, लवकर !

**गोपाळः**—आतां आलें आहे खरें माझें मरण इथें ! काय होईल तें खरें. हं चंपे, चल लपिव मला ! (लपून बसतो.) अंधळी कोशिंबीरच ही !

**केशवः**—काय करावें, पोष्टांत माझें रजिस्टरही आलें नाहीं. पाकिटांतले खटल्याचे कागद वकिलाला तरी दाखवून ठेऊं. वेळ नको उगीच जायला. ( खोलीकडे जाऊं लागतो, राधा अडवते. )

**राधाः**—इश्श हें काय मेलं असें, माझ्याशीं न बोलतांच आपआपल्या मनाशीं पुटपुटायचं तें ! मी कधीं जाऊं द्यावयाची नाहीं.

**केशवः**—( आहे, येत आहे ताळ्यावर प्रकरण लवकरच. आपणहि आतां अवसान आणलेंच पाहिजे. ) तें कांहीं नाहीं. मला वकिलाला आधीं कागदपत्र दाखिवलेच पाहिजेत. मग सावकाश बोलेन तुझ्याशीं. ( खोलीकडे जाऊं लागतो. )

**राधाः**—( लाडानें ) नाहीं, मी नाहीं जाऊं देणार. थांबा गडे जरा. हें पहा, मी तुम्हांला गंमतजंमत सांगतें ! ऐकायचं तरी !

**चंपाः**—( घरांत चोर शिरला म्हणजे धास्तीनें म्हाताऱ्या नवऱ्याची बायको असंच त्याचे लाड करीत असेल वाटतें. )

**केशवः**—छे, छे. मला आतां मुळींच फुरसत नाहीं. मग केव्हां तरी सांग. ( जाऊं लागतो. )

**राधाः**—( अडवून ) म्हणजे काय ? ऐकायचें तरी ! आतां कीं नाहीं, शंकररावांकडून मनुष्य आला होता.

**केशवः**—( दचकून ) बरें मग, काय म्हणत होता ?

**राधाः**—मला निरोप त्यांनीं पाठविला, कीं, कसेंहि करून मला एक वेळ भेटाच. गोपाळरावांनीं स्वतः हा निरोप सांगितला. पण बाई त्यांचा असला फूलिश निरोप ऐकून मला त्यांचा तिटकारा आला.

**केशवः**—इज इट सो ! बरें, पण तूं काय सांगितलेंस तें सांग आधीं ! सांग आधीं! काय करूं, जर का तो गोपाळराव मला इथें भेटला असता, तर दाखिवला असता चांगला तमाशा! चांगलें पाठीचें धिरडें केलें असतें.

**गोपाळः**—( संभाळरे देवा या प्रसंगांतून आज ! )

**राधाः**—अहो—पण ऐकून तर घ्याल कीं नाहीं बाई ? पुरुषांची भारीच गर्दी असते ज्या त्या गोष्टींत ! हें पहा. मीं कीं नाहीं, त्यांना क्रीडा गृहांत भेटेन म्हणून खोटाच निरोप पाठविला. मोडूं दे चांगली खोड त्यांची. आतां खचित ते वाट देखील उगीच पाहात बसले असतील !

**चंपाः**—( पहा—पहा, कशी लबाडी करते ती. खोटें बोलणें म्हणजे हा-तचा मळ आहे जसा कांहीं ! )

**केशवः**—काय म्हणतेस ? ठीक आहे. राहूं देत कागदपत्रें तीं ! हा असाच त्या क्रीडागृहांत जाऊन त्याचा समाचार घेतों. असा त्याला खडसून काढतों कीं, त्याला जन्मभर आठवणच राहिली पाहिजे. दुसऱ्या-च्या कामांत विनाकारण बिघाड करणाऱ्यांना चांगला धडा घालून दिलाच पाहिजे. ठीक आहे तर, मी जातोंच. ( जातो )

**गोपाळ**—( पुढें येऊन ) गेले एकदाचें शिरा ताणीत. जा खुशाल क्रीडागृहांत. तिथें आहे खेटर शंकररावाचें !

**राधाः**—तें असूं दे आतां. केशवरावांना निदान दोन तास तरी परत यायला लागतील. तर चला, त्या अवकाशांत शंकररावांकडे जाऊन येऊं. नो, नो, आय मस्ट बेग हिज पार्डन, चला.

**गोपाळः**—ठीक आहे, जाऊं या तर. आणखीं नाहीं तुम्हीं एक गंमत ऐकली ! केशवरावांनीं कांहीं कारण नसतां घराच्या मालकावर कुभांड घेऊन त्याचें बिऱ्हाड सोडलें, म्हणून तो केशवरावांचा खरपूस समाचार घेणार आहे म्हणे ! पहावें, तो काय करतो तें. ( इतक्यांत पुन्हां पावलें वाजतात व केशवराव एकदम आंत प्रवेश करतो. )

**केशवः**-अरे चोरा ! तूं पुन्हां येथें आहेसच ! अरे वा, चांगलाच श-हाणा दिसतोस ! हो बाहेर चालता. बोल, कां तूं माझ्या जागेंत पाऊल ठेवलेंस तें आधीं ? अरे वा ! हा तर थट्टेवारीं नेतो आहे सगळें !

**गोपाळः**—( हंसतो. ) बरें झालें आपली गांठ पडली. नाहीं तर मला पुन्हां देखील हेलपाटा पडला असता. मी तुम्हांला मुद्दाम स्वतः निरोप घे-ऊन आलों आहें.

**केशवः**—असें काय ! बरें, चल सांग निरोप काय असेल तो चट्दिशीं आणि हो चालता घराबाहेर !

**चंपाः**—( आतां गोपाळराव काय युक्ति करतात तें पहावें बाई; नाहीं तर आली आहे मार खायची वेळ. )

**गोपाळः**—अहो, पण असे रागावतां कां. माझा निरोप ऐकल्यावर बक्षीस घेईन बक्षीस तुमच्याकडुन !

केशवः—ठीक आहे. बक्षिसाची वेळ आली, तर बोल लवकर.

गोपाळः—मला शंकररावांनीं तुम्हालाच केवळ अस यला पाठविलें आहें, कीं ज्या अर्थी आपण राधाबाईविषयीं आहांत, तर त्यांनीं आपला नाद त्यांच्याविषयीं अजिबा राव ! तुम्ही कांहीं म्हणा, पण शंकरराव शहाणपणापेक्षां आहेत. त्यांनीं राधाबाईविषयीं नाद अगदीं सोडला असें तुम्हांला त्रिवार बजावून सांगायला सांगितलें आहे तर ते तिला आतां भगिनीसारखे लेखणार आहेत.

केशवः—काय म्हणतोस ? अगदीं शंकररावांचेच एक्सक्यूज मी देन.

गोपाळः—अगदीं शब्दन् शब्द त्यांचा ! राधा आणखीही त्यांनीं एक गोष्ट तुम्हांला जास्त सुचविली लांब घेऊन ) हें पहा, तारुण्य मुसमुसायला लागलें म्हण होते चंचल आणि तशांत राधाबाई आहेत जात्या ज अलगुजांच्या हौशी; तेव्हां त्यांच्यावर तुमची थोडी नज तसाच थोडा उपदेशही चालूं द्या. शिवाय ह्या चंपेची चांगली आहे. तसेंच ती अतिशय प्रामाणिक आहे व राधाबाईंच्या स्वभावांत बराच पोक्तपणा येईल. वगैरे ए अशा हजार गोष्टी तुमच्या कळकळीच्या सांगितल्या.

चंपाः—( धन्य आहे बाई यांच्या प्रसंगावधानाची ! काय कहाणी सांगतात कोण जाणे. )

केशव—( अगदीं आनंदी मुद्रेनें ) वेल डन् गोपाळ जस्ट शेकहँड ( शेकहँड करतो ) गोपाळराव ! खरोखर—

पद—( शामचुनरिया दे दे )

घेति जन जे संशयांना ॥ चिंतिति अनुदिनिं विक
सौख्य न लाभे मुळीं तयांना ॥ ध्रु० ॥ संशय

तर जडतां ॥ कोणि न गवसे त्यासि रोधिता ॥ मृत्यु
निमंत्रण कां न म्हणाना ॥ १ ॥

खरेंच शंकरराव मोठा दिलदार मनुष्य बोवा. असे जन्टलमेन फारच थोडे सांपडतील ! हें घ्याच तर बक्षीस गोपाळराव. आय अॅम सो प्लीज्ड् ! ( त्याला घड्याळ देतो. ) तुमच्या कामगिरीपुढें हें कांहींच नाहीं, तरीं पण स्वीकार करावा.

**गोपाळः**—कांहीं हरकत नाहीं. आपली माझी इच्छा कांहीं दोन नाहीं.

**केशवः**—वेल, राधाबाई—झाल्या गोष्टीबद्दल मला फार वाईट वाटतें. आपल्या कॅरेक्टरबद्दल संशय घेतला याबद्दल मला पश्चात्ताप होत आहे. काइंड्ली एक्सक्यूज मी. तुझ्यासारखे व शंकररावासारखे ऑनेस्ट फ्रेंड्स् मला मिळाल्याबद्दल अतिशय अभिमान वाटतो. (तारवाला प्रवेश करतो) काय टेलिग्राम ?

**तारवाला**—होय. इथें कोणी केशवराव सातारकर नांवाचे गृहस्थ आहेत का ? रिप्लाय प्रीपेड आहे.

**चंपा**—( हा मेला नेहमींच्या तारवाल्यासारखा नाहीं दिसत. )

**केशव**—होय. होय. मीच तो. थांब, वाचून उत्तर तुझ्याच बरोबर देतों. ( तार वाचतो. ) काय ? 'अंकल डेड स्टार्ट इमीजियेट्ली.' ( डोळयास रुमाल लावतो ) अरेरे ! काकांचा माझ्या पश्चात् असा एकाएकीं अंत व्हावा ना ! काय दुर्दैवी तरी मी ! ( गोपाळराव व चंपा एकमेकांत कुजबुजतात. तारवाला हंसतो. )

**राधाः**—कां, आपण असे कां एकदम दचकलांत ? ( तार वाचते ). आय सी, आय सी ! अरे अरे फार वाईट झालें !

**केशवः**—असो, ईश्वरी इच्छा ! मला साताऱ्याला गेलेंच पाहिजे. कान्ट हेल्प इट्. मस्ट गो. माझें तेथील काम संपतांच मी परत येतों. अरे वा ! हे कोण शंकरराव ! बरें झालें यांचीही भेट झाली.

**गोपाळः**—( आतां हा आमचा टोणगा काय करतो देव जाणे ! करतो काय ? जाणारच जातीवर म्हणा ! ) राधाबाई, आतां तुमच्या सत्त्वपरी-

क्षेची वेळ आहे. आतां शंकरराव वेड पांघरणार असें दिसतें आहे. ( कोणाला ठाऊक हा वेडा नाऱ्या काय करतो तें ! तेव्हां आधींच हिलाही थाप मारून ठेवावी. )

**केशवः**—कम लॉंग, शंकरराव कम लॉंग. मेनि थँक्स. मेनि थँक्स. आपले उपकार कधींच फिटणार नाहींत.

**चंपाः**—( असें कां हे भूतसंचार झाल्यासारखे पहाताहेत. गोपाळरावांचें सगळें उघडकीस येणार वाटतें. )

**शंकरः**--( शेकहँड न करतां रागानें व तिर्सटपणानें ) नाहीं, मीं कांहीं तुमच्यावर उपकार केला नाहीं. व्हॉट हॅव आय इन ?

**राधाः**—अलो. मोस्ट वीटी. अग बाई, बाई, काय लुच्चेगिरीचें सोंग घेतलें आहे पण ? भारींच थट्टेखोर स्वभाव हो !

**केशवः**—नो, नो, दॅट वोन्ट डू. माझ्यावर इतका उपकार करून तो उलट माझ्याशींच लपविण्यांत तुमचा दिलदारपणा तर अधिकच शोभतो. नका लपवूं ! गोपाळरावांनीं आपला निरोप कळविला मला.

**गोपाळः**—( आली गदा आमच्यावर. आतां मात्र पळ काढला पाहिजे. ) ( गोपाळा शंकररावांस खुणेनें दाबतो व नमस्कार करतो. )

**शंकरः**—अरे मूर्खा गोपाळा ! बोल. बोल, काय खोटा निरोप सांगितलास तो ? नाहीं, मी खुणाविणा जाणीत नाहीं. बोल, काय स्पष्ट आहे तें ? खऱ्या गोष्टीला लपंडाव कशाला ? ( गोपाळा लांबून हात जोडतो. सर्व हंसतात. )

**राधाः**—अग बाई, बाई, बाई, बाई. अगदीं हसून हसून पोट दुखून आलें ! चल गडे चंपे, आंत जाऊं या. मला अगदीं मेलें हसूं आवरेनासेंच होतें. शर्थ आहे बाई. ओ मोस्ट चार्मिंग, मोस्ट विटी. ( जातात. )

**गोपाळः**—हं, हं, हं, अहो, पण एक शब्द तरी ऐका.

**शंकरः**—अरे चोरा ! तूं मला हुकूम करणार कोण ? आज मीं तुला निरोप तरी सांगितला ? चोरा ! खोटें कुभांड ?

**गोपाळः**—हां, हा, पहा. पहा. गेल्या वेळची आहेना आठवण ?

**केशवः**—अहो, पण आतां हा वाद कशाला ? आपण तिला बहीण मानलीत यांत सर्व आलें. राधेचा नाद सोडलात ना ?

शंकरः---काय--बहीण -आणि माझी लाडकी राधा--आणि ह्या गाढवानें सांगितलें ?

गोपाळः---( खुणावतो--अहो पण हो म्हणा--शंकरराव नाहीं म्हणतो )

केशवः----काय. मग हें सगळें खोटेंच तर ? अरे चोरा गोपाळा ? तूंच कां हें सांगितलेंस ?

शंकरः---अहो पण तुम्हीं कां त्याच्यावर विश्वास ठेवलात हें सांगा आधीं ? ( तारवाला ओळखून त्याचें गळचंडें धरतो. ) अरे वाः कोण त्रिंबकराव ? वाहवा ! वाहवा ! तुम्ही तारवाले केव्हांपासून झालांत ?

केशवः---काय, हा तारवाला नव्हे तर ! आज आम्ही वेताळाच्या नगरींत तर नाहीं ना ? अहो मग हा कोण ?

शंकरः---अहो हाच आमचा घरवाला तो. सगळ्या गांवचा लबाड, चोर, पाजी ! हाच आला असेल नाहीं तर, माझ्या त्या राधेला पळवायला परस्पर---

तारवालाः---( आतां कांहीं मी जिवंत सुटत नाहीं.) अहो शंकरराव, आमचा प्लॅन वेगळाच आहे. जरा जीभ आवरा.

शंकरः---पुरेरे बोवा तुमचे प्लॅन--केशवराव--ऐका-- प्लॅन आहे म्हणे !

केशवः---मग ही काका मेल्याची तार खोटीच तर ! हॉरीबल ! पॅक ऑफ स्कॅउन्ड्रल्स ! कायरे गोपाळ ?

गोपाळः---( तारवाल्याच्या अंगावर धावून मारतो. ) अरे हरामखोरा ! अहो यानेंच तर मला शंकररावाचा निरोप असा असा आहे, हें तुम्हांला सांगायला सांगितलें. मला हो काय जरूर होती या भानगडीशीं ? ( त्याला मारतो. ) असला हरामखोर, पाजी आहेस काय ? खोटा निरोप सांगितलास काय ? ( मारतो. )

तारवालाः---अरे मारतोस कां ? मी कुठें निरोप सांगितला ? अरे पण मी कुठें निरोप सांगितला. मारतोस कां ?

गोपाळः---तूं कुठें सांगितलास, तर का रामोशा मला स्वप्न पडलें ? पाजी कुठला ! हा तारवाल्याचा पोषाख घ्यायला मीच सांगितलें. असेल ? हं बोल ? तुला काय, उचलली जीभ लावली टाळ्याला. ( मारतो. )

तारवालाः---अहो पण खरेंच. अरे वा ! तुम्हीच उलटता माझ्यावर ?

ही खोटी तार तुम्हींच नाहीं का लिहिलीत ?

गोपाळः—तोंड संभाळून बोल. मुस्कटांत बसेल–संभाळ–( त्याला लाथा मारून घालवून देतो. ) अहो केशवराव, तुम्हीं काय लागलांत याच्या नादीं—ह्यान लेकाचें हें कृत्य–त्याच्या इथलें तुम्हीं बिऱ्हाड हलविलें नव्हतं झालें भाड्याचें नुकसान म्हणून स्वारीनें केलीन ही युक्ति, नग चांगली गळ्यांत आली.

चंपाः—( प्रवेश करते. ) चला. दिवाणखान्यांत चहा वगैरे सर्व तयार आहे.

केशवः–( बरें झालें. सगळा दंभस्फोट लवकर झाला, नाहीं तर सातारचा हेलपाटा होता नशिबीं–कांहीं कां असेना, त्या गाढवानें उपकारच केला म्हणायचा. ) ठीक आहे. एकंदरींत त्रिंबकरावानें सर्व घोटाळा केला, बरें आहे, करतों त्याची व्यवस्था पोलीस मार्फत लवकरच. ( निघून जातो. )

शंकरः--(तो गेलासे पाहून) कां सोळा आणे झाली कीं नाहीं केशवरावाची. घेतला कीं नाहीं जशास तसा सूड ! (गोपाळराव हंसतो.) चोर कुठला ! माझ्याशीं डांवपेंच करतो. कां आहे कीं नाहीं--चल, दे या वेळेला टाळी. कां, बोलत कां नाहींस ?

गोपाळः—काय गोष्ट आहे तुमची. या तुमच्या कामगिरीबद्दल कोणत्या कोशांत नांव सांपडलें ह्याचा विचार करीत होतों. भले बहादर ! बहार केलीत अगदीं ! त्या केशवरावांशीं तुमचें–मी सारखा दाबीत असतां--भांडण, त्या त्रिंबकरावाला तारतम्यानें तुम्हीं दिलेली ओळख--वगैरे, वगैरे गोष्टी व यांत लढविलेले तुमचें डांवपेच मानवकोटीच्या आटोक्याच्या बाहेरचे बोवा ! आपल्या अक्कलेचें प्रदर्शन करण्याच्या या आनुभविक युक्त्या आमच्यासारख्या दोन पायांच्या माणसाला थोड्याच साधणार !

शंकरः—अरे फसलों तर ! (तोंड वेडेंवांकडें करून) पण त्या त्रिंबकरावानें--गाढवानें कां सोंग पालटलें उगीच.

गोपाळः—महाराज, या तुमच्या डोक्यांचा खडक इतका कणखर आहे कीं, दहा पांच सुरुगानें खपला देखील उडणार नाहीं. नाहीं बाबा माझी अंकल तुमच्या पुढें काम करीत. खूपच केली महाराज !

**शंकरः**—असें रे काय गोपाळ, पण मला हा तुमचा बेत कसा कळणार ! तूं माझा जिवलग स्नेही ना ?

**गोपाळः**—अहो, काका मेल्याची खोटी थाप मारून त्याला पळविला म्हणजे तुम्हांला आपलें काम नसतें का साधतां आलें ? आतां काय रडूं तुमच्या पुढें ! काय घात केलांत ! बरें, तुमच्या विषयीं व राधाबाईविषयीं त्यानें संशय घेऊं नये म्हणून त्याला सांगितलें कीं, शंकररावांनीं राधाबाईचा नाद सोडला; तिथें कां आणखी अडमडलांत ? संभाळा बाबा तुमचें तुम्ही हें.

**शंकरः**—नाहीं, नाहीं, असें काय बरें ? तुझ्याशिवाय माझें कोण आहे बरें दुसरें ? हें पहा, क्षमा कर. ( हात जोडतो. )

पद—( पती त्यागिला शयनीं )

आणीं मम करुणा स्वमनीं ॥ बोल न या वचनीं टोंचुनी ॥
॥ ध्रु० ॥ जपतों तीच सदा तरुणी रमणी ॥ येतीं बोल
मधु अजुनी श्रवणीं ॥ भेटवि ती हरिणाक्षी, मनमोहनी
राज्ञी ॥ १ ॥

आतां तर झालें ना. हात जोडले म्हणजे देव देखील ऐकतो. अतां असें नाहीं पुन्हां करणार. कसेंहि करून घेच मनावर पुन्हां एक वेळ ! तूं सांगशील तें देतों आणि सांगशील तसें ऐकतों. पण जुळीव कसें तरी पुन्हां.

**गोपाळः**—नको बोवा ही पंचाईत पुन्हां ! कारण, तुम्हीं येतां चढऊन चिलीम, आणि मी पडतों तोंडघशी ! मी कशाला उठाठेव करूं. मार खायला मला नाहीं आलें एवढें बळ. आतां तो त्रिंबकराव तारवाला होता म्हणून वेळ नेली मारून. नाहीं तर, आलेंच होतें गंडांतर !

**शंकरः**—गोपाळा ! कितीरे निर्दय आहेस तूं ? पुन्हां नाहीं चुकणार. ( हात जोडतो ) यांत सगळें समज. एक वेळ झालें तें झालें. आतां अगदीं कानाला खडा. विचार करूनच काय तें करीन.

**गोपाळः**—( मला याची अगदीं कींव येते ) मग काय, बायको पाहिजे म्हणतां ? ( तो होय म्हणतो. ) ठीक आहे, चला तर.

**शंकरः**—बघ तर खरें, मग म्हण. चल तर आपण प्रथम आपल्या घरींच जाऊं या.

---

## प्रवेश ४ था.



**इंदिराः**—एकंदरींत आज मला नाटकच करून दाखवायचें तर! ठीक आहे, मीहि पण इंदिरा आहें! बाईची क्लबफंडाबद्दल ड्यूटी करीत असतांना आपलेंही काम आपण साधलें पाहिजे. तें मेलं वामनरावांचं भूत आलें म्हणजे दोन घंट्यांची निचिंति; मेल्याच्या उपमांचा भाडिमार सुरू झाला म्हणजे पोट धरधरून हासूं येतें आणि त्याच्यासमोर हंसलें तर आपलें एखाद्या वेळेस काम फिसकटायचें. काय बाई कल्पना तरी, म्हणे आम्हीं शिकलेल्या सवरलेल्यांनीं सर्व सुधारणा केलीच पाहिजे, ती अगदीं भाषेच्या उपमांपर्यंत. हो, पण सध्यां आपण द्रव्यदृष्टीच ठेवली पाहिजे. कांहीं का असेना, माझा द्रव्ययोग जवळ आला आहे खरा, पण ह्या भानगडींत माझा भोग न उभा राहो म्हणजे झालें. आज चांगलें त्यांना खुलवून रंगिवलें पाहिजे. त्यांत काय आहे म्हणा! खरें म्हटलें तर पुरुष मेले जातींचे बावळटच! जरा थोडा पदर घेतला कीं, लागलेच मेले आशाळभुतासारखें करायला. ( घंटा वाजते ) कम अलाँग, मिस्टर वामनराव, कम अलाँग.

**वामनः**—( सिगारेट ओढीत प्रवेश करतो. ) मे आय ब्रिंग ए स्मोक इन्?

**इंदिरा**—सरटनूली, ओ नेव्हर माईंड, टेक युअर सीट. ( खुर्चीवर बसतात. )

**वामनः**—आपल्या भेटीला बरेच दिवस झाले. वेल हाउ यू डू. कसें काय ठीक चाललें आहे ना?

**इंदिराः**—ओ थँक यू. आपल्या कृपेनें ठीक चाललें आहे. आतां परीक्षा जवळ आली आहे.

**वामनः**—होप यु वुइल् पास. आहे, तुमचा अभ्यास चांगला आहे.

शिवाय तुम्ही जात्या बुद्धिवान् आहांतच. रूपवान मनुष्यें बहुतेक सुस्व-भावी व चतुर असतात असा आपला माझा अनुभव आहे.

**इंदिराः**—छे, छे ! हा आपला थोरपणा आहे. मी मुळींच तशी रूपवान नाहीं.

**वामनः**—नो, नो, नो. तुमच्या शिक्षणामुळें तुमचें तेज तर द्विगुणित होत आहे. तुमचें बालपण म्हणजे सुरवंटाची निद्रावस्था होती ! निद्रा-वस्थेंतून पुढें जसें जसें त्याचें तेजःपुंज फुलपाखरूं बनतें, त्याचप्रमाणें तुमचें सौंदर्य, यौवन आतां पूर्णत्वाला येऊन त्याला मनोहर फुलपाखराचें रूप आलेलें आहे. फार काय सांगूं ! मला तर तुमच्या ह्या नाजुक आणि मोहक शरीरांत सर्व त्रैलोक्य एकवटलेलें दिसत आहे असेंच कां म्हणाना?

**पद**—( फुलवाबिनडार )

**प्रगट दिसत विश्व अखिल ॥ नाजुकशा देहिं विमल ॥**
**अधरिं स्वर्ग कटिं मृत्यू ॥ पदतलीं तें पातालहि ॥ ध्रु० ॥**
**रविशशिवत् नयन गोल ॥ धूमकेतु भ्रूविलोल ॥ दंतकुंद**
**स्वर्गंगा ॥ बोल गमति कल्लोलहि ॥ १ ॥**

**इंदिराः**—[ केलेन् मेल्यानें सुरू आतां. ] हो, तुम्हांला एखाद्याची स्तुति करायला सांगायला नकोच. अगदीं एक्स्पर्ट अहात !

**वामनः**—मी कशाला स्तुति करूं ? तुमच्या लावण्यानें सगळ्यांचे रेकॉर्डस् ब्रेक केले आहेत. तुमच्या डोळ्यांतील तेज रेडियमलाहि लाजवीत आहे. ह्या डोळ्यांचे किरण ज्या ज्या पदार्थावर पडतील तो तो पदार्थ मॅगनेट्सारखा तुमच्याकडे आकर्षिला जातो. तुमच्या प्रेमाचा विद्युत करंट सुरू होतांच त्या मनुष्याचें स्वसामर्थ्य नष्ट होऊन, होका यंत्रासारखा तुमच्या चरणदक्षिणेकडे डोकें टेंकून दक्षिणोत्तर होतो. ह्याचा प्रत्यक्ष पुरावा हा मीच पहानात.

**इंदिराः**—( वामनराव नम्रता दाखवितो ) नो, नो, आय नो यु-अर हार्ट.

**वामनः**—हें पहा, इंदिराबाई, आज मी तुमच्या जवळ माझें सीक्रेट ओपन करणार आहें. तसेंच आज संधीही बरी आहे. याबद्दल मी मागें,

आपणास थोडी विनंती केली होती. त्यावर तुम्हीं थिंक केलेंत का ?

**इंदिराः**—वेल, वामनराव नाऊएडेज आय ॲम व्हेरी बिझी, मला मुळींच वेळ नाहीं.

**वामनः**—नका, नका ! इंदिराबाई, आपण माझा असा अव्हेर करूं नका. माझ्या आयुष्याच्या आगगाडीचे आपण सांधेवाले आहांत. मला हा असा निराशेचा लाल सिग्नल दाखवून माझी आगगाडी अशी मध्येंच घाटांत थांबवू नका. निरनिराळ्या सुखांच्या कल्पना—तरंगांचे, माझ्या आयुष्यआगगाडींतील पॅसेंजर्स कसे अधीर झाले आहेत. तुमच्या हृदयांतील स्टेशन मास्तरानें तुम्हांला लाईन क्लीअर आहे असा संदेश सांगितला नाहीं का ?

**इंदिराः**—( काय मेलं भूत आलें आहे अंगांत ! ) वेल. मीं अजून या बाबतींत मुळींच विचार केला नाहीं.

**वामनः**—इंदिराबाई, असे हार्श शब्द उच्चारूंच नका. बदला, बदला माझ्या आगगाडीचा सांधा ! तिला असें तिष्ठत न ठेवतां मेन लाईनवर घ्याच. इंदिराबाई, बराच काळ सायडिंगवर पडल्यामुळें, हृदय बॉयलरमध्यें आशेची स्टीम अनावर झाली आहे. इन्जीनचें सारासार विचाराचें सेफटी व्हॉल्व्ह निरुपयोगी ठरूं पाहात आहे. या वेळेस जर आपण आपल्या प्रीतीचें शुभ्र निशाण मला दाखविलें नाहीं, जर आयुष्य गाडीचें एंजिन मेन् लाईनवर घेतलें नाहीं तर, तें अनावर होवून केव्हां तरी सर्व आगगाडी उलथून पडल्याशिवाय राहणार नाहीं.

**इंदिराः**—( जाईनास का मेल्या उलथून गेलास तर ! पण दागदागिनें नि पैसा उलथेल कीं ! ) आपण असें कां अधीर झालांत ? ह्याबद्दल मला माझ्या सर्व आयुष्याचा विचार करावा लागेल. तसेंच या बाबतींत मला बाईनाहीं कन्सल्ट केलें पाहिजे. शिवाय ही सर्व परीक्षा होईपर्यंत ह्या बाबतींत मन घालणें धोक्याचें आहे.

**वामनः**--आं ! तर मग परीक्षा होईपर्यंत माझी गाडी अशीच लूपलाईनवर शंट करून ठेवणार कां ? नका; इंदिराबाई, असें कां उद्गार काढतां ? माझ्या आगगाडीचा सांधा बदलल्यानें ती तुमच्या परीक्षेच्या आड कधींच येणार नाहीं. तुमचें प्रेमाचें लाईन क्लीअर मिळून तुमचें हास्यरूपी शुभ्र

निशाण पाहण्याकरितां मी कसा अधीर झालों आहें. माझ्यामुळें आपल्या व्यवसायांत कांहीं व्यत्यय येईल ही कल्पनाहि आपणास नको.

**इंदिराः**—आपण किती जरी मला सांगितलें तरी, माझें मन मुळींच घेत नाहीं; परीक्षा आली जवळ नि ह्या उठाठेवींत एकदां पडून जर का मी नापास झालें, तर मला तोंड दाखवायला सुद्धां जागा राहाणार नाहीं. मिस्टर वामनराव, प्लीज एक्स्क्यूज् मी. आय ॲम सॉरी. आय कांट हेल्प इट ! माझा नाइलाज आहे. ( सुस्कारा टाकते. )

**वामनः**—असे उष्ण श्वास कां सोडतां ? इंदिराबाई, तुमच्यासारख्यांनीं दयेचा त्याग करावा हें मोठें नवल आहे ! सर्वांवर दया करावी ही देवाची पहिली आज्ञा आहे. दयेकरितां, मिशनस्कुलें आहेत, दयेकरितां हॉस्पिटल्स् स्थापिलेलीं आहेत, दयेकरितां आर्फनेजिस आहेत, दयेकरितां डिप्रेस्ड् होम्स, पाणपोया, धर्मशाळा आहेत. सर्व जग दुसऱ्यावर दया करण्याकरितां झटत आहे, असें असतां तुम्हीच दयेचा कां त्याग करतां ? आपले हे दीर्घ श्वास जरी तुम्हांला निरुपद्रवी वाटतात, तरी ह्या पॉयझनस गॅसेसनें मला अगदीं गुदमरून टाकलें आहे. ( ती पुन्हां सुसकारा सोडते. ) नका, ह्या श्वासनलिकेंतून असे हे पायझनस गॅसेस सोडूं नका. ह्या गॅसेसमुळें मला पाण्यांत बुडाल्यासारखें-सफोकेट झाल्यासारखें, क्लोरोफार्म दिल्यासारखें, किंवा ॲपोप्लाक्सीची फीट आल्यासारखें होत आहे. इंदिराबाई, एक वेळ तरी उत्साहजनक कृपादृष्टीचा ऑक्सिजन मजवर टाका व ह्या संसाराच्या वॉरफील्डवरून आपल्या काइंड नर्सिंग ट्रीटमेंटमध्यें मला घ्या.

**इंदिराः**----( ये मेल्या ! चांगला अफूचा गोळा देते; म्हणजे आगगाडीचें नि वॉरफील्डचें खूळ तरी विसरशील ! माझ्या नर्सिंग ट्रीटमेंटमध्यें दोन दोन धपाटे एकएका डोजला देतें ! मला आतां हें चऱ्हाट वळवणार तरी किती बाई ? मलाच उलट फिट येईलसें वाटतें. ) ह्या सर्व गोष्टी सध्यां तहकूब ठेवाव्या असें माझें मत आहे. तसेंच या संबंधीं बाईच्या कनसल्टेशनची जितकी जरूरी आहे तितकीच माझ्या फ्रेन्ड्सच्या विचारांचीही जरूरी आहे असें नाहीं का तुम्हांला वाटत ? पुरुषांना ह्या गोष्टी जितक्या सहज वाटतात तितक्या मुळींच नाहींत. पुरुष नामानि-

राळेच राहून त्यांचे सिझल्टस सर्व स्त्रियांना सफर करावे लागतात. मिस्टर वामनराव, डोन्ट बी डिसहार्टेन्ड. जगाची मी आपली एक रीत सांगतें.

**वामनः**—नो, नो, इंदिराबाई. डोन्ट बी डेस्परेट.

पद—( नदिया गैरिभरी )

नयना प्रेमभरें आश्रू आले ॥ कांहिं सुचेना ॥ मन विरमेना ॥ ध्रु० ॥ विनवितो हा दास पाया ॥ करुणवचनां नकरी अवमाना ॥ १ ॥

असल्या असंभाव्य गोष्टीचा मुळींच विचार करूं नका. अशा निर्दय होऊं नका. आपल्या वचनावरच माझें सर्वस्व अवलंबून आहे.इंदिराबाई, हे आपले डांबरासारखे काळेभोर तुळतुळीत केश, सहाणेसारखे रुंद कपाळ फाउन्टन पेनसारखें सरळ नाक, शेवरीच्या मखमली गिरदीसारखें लुसलुशीत गाल, मायक्रोफोनसारखें तीक्ष्ण कान, अहाहा जों जों तुमच्याकडे पहावें तों तों अधिकच मोहक! हार्मोनियमच्या पट्ट्यांनाहि लाजविणारी ही दंतपंक्ति, ड्यूकच्या क्रीकेट बॉललाहि खालीं मान करण्यास लावणारें वक्षस्थल, फुटबॉलला दिपविणारें नितंब, इतकें सुंदर अपटुडेट् लावण्य त्या प्रभूनें तुम्हांस दिलें असतां तेवढें हृदयच मजाविषयीं टेनिस ग्राउंडसारखें कां टणक करतां ? इंदिराबाई इतर सुधारकासारखा मी शतमूर्ख नाहीं ! किंवा अंधपरंपरेच्या खातेऱ्यांत लोळणारा मी घाणेरडा हॉग नाहीं, हें मीं का आपणाला सांगितलें पाहिजे ? ( जवळ जातो व ती उभी राहते. )

**इंदिराः**—इश्श कोणी तरी येईल बाई ! वेल मिस्टर वामनराव ! वाट्स् ऑल धिस अबाउट ! आय डोन्ट लाईक इट. डोन्ड बी इमपेशन्ट असे अधीर कां होता ?

**वामनः**—आयुष्याच्या क्षणभंगुरतेबद्दल माझा देखील निरुपाय आहे. तें कांहीं नाहीं आपण आजच माझा फायनल रीझल्ट लावला पाहिजे. बोला ? तुमच्या सफरचंदासारख्या गोड भाषणावर माझें सर्व लाईफ अवलंबून आहे; तुम्ही असें मौन कां धरतां ? तुम्हीं एक वेळ आपला म्हणा. तुमच्या प्रेमाच्या झेपलीनमध्यें मला जागा द्या ! म्हणजे तुमच्या झेपलीनच्या

पाठिंब्यानें सर्व जग मला ठेंगणें होईल. एक वेळ मला आपला म्हणा, तुमच्या बुटासारखा मी निरंतर पायाला चिटकून राहीन, त्याला बुट पॉलीश करीन. तुमच्या गालाला चेरी ब्लॉसम लावीन, मुखांत राजबेरी, ॲप्रिकॉट घालीन. इतरांच्या सारखा सुधारणा, सुधारणा, म्हणून थोतांड न करतां तिला स्वतःच्या वळानें वळण लावीन. इतकेंच नव्हे, तर मूर्तिमंत सुधारणेचें प्रदर्शन भरवीन, माशा अंत कां पाहतां ? आपल्या मोहक कुंकुमकरंडक अधरांतील इनव्हालिडपोर्टसारख्या मुखरसाचा घुटका घेण्यास माझे प्राण कसें ताहानेनें व्याकूळ झालेले आहेत. बोला, ( उठून तिला धरतो. )

इंदिरा:–( बाईनीं माझ्या मागें कसली मेली ही पिडा लावली आहे. केव्हां सुटते. देव जाणे ! ) वेल वामनराव ! तुम्हीं हें काय आरंभलें आहे ? कोणी पाहिलें तर काय म्हणेल बाई आपण असे निराश मुळींच होऊं नका. पण आपण असे खुर्चीवर बसा. बसायचें होतें गडे; मी अशी जवळ उभी राहतें.

पद–( मेरो मन छीन लियो )

किंकरि निकटि वसे ॥ ही ॥ हृदयिं अधिरता कां विलसे ॥
॥ ध्रु० ॥ होईन ज्ञानगुणनिपुणा ॥ पूजीन सतत मग
चरणा ॥ करुं विलास उभयतां नाना ॥ तोंवरीं, धीर
अंतरीं, विनविते ठेवावा ॥ १ ॥

( ह्या वेड्याकडून मला माझें काम साधलें पाहिजे. )

**वामनः**–नुसतें या भाषणानेंच पाण्यानें भिजलेल्या स्पंजासारखें तुझें अंतःकरण दयेनें चिंब झालें आहे हें तूं प्रत्यक्ष मला दाखविलेंस. इंदिरे, तूं मजबद्दल थोडी संशयग्रस्त दिसतेस, पण तो संशय अगदीं अन्यथा आहे. तूं मला एक वेळ आपला म्हण, कीं तुझी सर्व इच्छा तृप्त झालीच समज. तुझ्या भुवयांची आज्ञा होतांच ती पाळण्याकरितां ओव्हर्लंड एक्सप्रेस किंवा पंजाब मेलसारखा धावत जाईन ! तूं ज्यांचा तिरस्कार करशील त्या शत्रूवर नेव्हल किंवा क्रप गनूसारखा मारा करीन ! तुझी निंदा, टवाळी, निर्भर्त्सना करणाऱ्या समाजरुपी ड्रेडनाटवर, टार्पेडो सारखा धां-

वत जाऊन त्याचें तुकडे करीन !

**इंदिराः**–( कसलारे मेल्या टारपेडो ! जाईनास का येथून एकदाचा टारपेडो सारखा निघून म्हणजे सुटेल तरी त्रासांतून. )

**वामनः**–इंदिरे, माझें गायरासकोप तूंच आहेच, त्याला चलन देणारी बॅटरी तूंच आहेस. माझ्या विचाररूपी गॅनकॉटनचा स्फोट करणारी इंडक्शनकॉईलही तूंच आहेस. इंदिरे, समाज समुद्रांतून इष्ट कार्यसिध्यर्थ माझ्या टॉरपेडोस गती देणारें पेट्रोल एँजिनहि तूंच आहेस, इंदिरे हा तुझ्यावर निस्सीम प्रेम करीत आहे. हा तुला शरण आहे. माझी वाटेल तशी कामगिरी घेणें सर्वस्वीं तुझ्यावरच आहे. तेव्हां कसेंहि करून मला आपला म्हण.

**इंदिराः**–मी आपला म्हणविण्याच्या आधीं माझ्या कांहीं कंडिशनस आहेत, तसेंच आपलें माझ्यावर इतकें निस्सीम प्रेम आहे असें म्हणतां, तर मग ह्या पायोनअर क्लबचा अशो कां बरं स्टेट असावी ? तें कांहीं नाहीं, माझें मागणें, मान्य केलेंत म्हणजे आघाओघानें तुम्हांला आपलें म्हणायला काय माझी हरकत आहे ?

**वामनः**–एक्सलेंट, प्रामिजींग, तुझ्या मागणीचें मला तर कांहींच वाटत नाहीं. उलट, वादळापूर्वी जसें बॅरामिटर चंचल होतें, व्होलकेनो इरपशनपूर्वी जसे धरणीकंप होतात, त्याचप्रमाणें यापुढें तूं आणि मी एक होणार ही कल्पना येतांच माझ्या शरीरांत प्रेमकंप होत आहेत !

**इंदिराः**–पुरुषांचें सगळें ताकापुरतें रामायण असतें, असा माझा अनुभव आहे. नेहमीं त्याचें वर वर बोलणें असतें. एकदरींत बायका बीज वधू असोत तिज वधू असोत, थोडासा तरी परस्वाधीनपणा येतोच.

**वामनः**–इंदिरे, चुकतेस. स्त्रियांना पुरुषांसारखी स्वतंत्रता देणें हें तर माझें ब्रीद आहे. माझी स्वतंत्रतेची कल्पना अगदीं स्वतंत्र आहे. चराईच्या हिरव्यागार कुरणांत कालवडी जशा शेपूट वर करून धांवतात, बागडतात, हरणाच्या कळपांत जशा हरिणी मन मोकळे रवंथ करीत असतात, तर मग याच्यापेक्षां श्रेष्ठ म्हणविणाऱ्या चालत्या बोलत्या बायकांनीं त्यांच्या शतपट तरी जास्त स्वतंत्रता अनुभवावी असें माझें निर्भीड व प्रांजळ मत आहे. इंदिरे, तूं माझी होतांच सांगशलि त्या फ्रेंडकडे, टांग्यांतून तुला

एकटी पाठवीन. चार फ्रेन्डस घरीं घेऊन आलीस तर, त्यांना चहा करून देईन; त्यांच्याशीं लाडानें, कौतुकानें तूं संवाद करीत असतांना मी तुझ्या टेबलाजवळ पडून राहीन. तूं तेथून निघून जा म्हणून हुकूम करतांच स्त्री-स्वातंत्र्याचा बाणा बाळगण्याकरितां तेंही मी निमुटपणें करीन.

इंदिरा—आपण स्त्रीस्वातंत्र्याचे पूर्ण अभिमानी आहांत म्हणूनच तर मला बरीचशी उमेद आहे. बरें, पण आपण जर अभिमानी म्हणवतां तर लेडीज थिएटर बिल्डिंग फंडाला आपण किती मदत देणार ? खरेंच गडे, आपण चांगला हातभार लावायचा होता.

वामनः—पण माझी कुठें ना आहे ? आण तुझी ती लिस्ट. मी आंकडा घालतों. ( ती लिस्ट देते व हा तीनशें रुपये घालतो. )

इंदिराः—छे बाई, इतकेंच कां ? तीनशें ? येवढ्यानें तें काय होणार? आपण जर परवानगी देत असाल तर मी आणखी एक अंक पुढें ठेवतें ? ( ती त्याच्यापुढें एक लिहिते. ) तीन हजार एक ! कांहीं जास्त नाहींत आपल्याला ?

वामनः—अंकावर अंक ठेवल्यानें संख्या वाढते ना पण ?

इंदिराः—आपल्याला लवकरच आपलें म्हणवावयाचें मला आहे, तरी संख्येच्या वाढीची रिस्पॉनसिबिलिटि दोघांनाही सारखीच आहे. आपल्याला नको एकट्याला त्याची काळजी !

वामनः—मी तुझ्या इच्छेच्या आड मुळींच नाहीं.

इंदिराः—बरें हें फंडाचें झालें. पण मला आपली देणगी कांहींच का नसावी !

वामनः—अग तुझ्याकरितां तर मी सर्वस्व देणार आहें. ही घे पांच हजारांची डायमंड रिंग. ही ह्या क्षणींच एंगेजमेंटरिंग मात्र तूं म्हटली पाहिजेस. ( तो रिंग काढून घालूं पहातो व ती आगेमागें करते. )

इंदिराः—मी तरी आपल्या इच्छेआड कां जाऊं ! ( मी घालतें गडे नाहीं, मी घालतों, असें उभयतांत भांडतात. शेवटीं वामनराव रिंग घालून हाताचा मुका घेतो. )

वामनः—अहाहा ! परमेश्वरानें उसाच्या करव्यासारखी गोडी तुझ्या

हाताला दिलेली आहे देवा, हा हात ह्या हृदयाशीं निरंतर पोटिसासारखा चिकटून राहील तो सुदीन ! इंदिरे, सजातीय झाडांच्या फांद्या एकमेकांस बांधून ठेवल्या म्हणजे एक जीव होतात, तद्वतच तूं जंबूरी व मी पप-नस हीं झाडें कल्पून लग्न होताच एकमेकास हस्तरूपी फांद्यांनीं चिकटून प्रेमजलांचा वर्षाव करून, एकमेकांवर कलम बांधून एक जीव होऊं या. एकमेकांचीं गुणरूपी फळें एकमेकांस देऊंया. पपनस कोणता व जंबूरी कोणती ही ओळख देखील उद्भिज्जशास्त्रवेत्त्याची बुझवूं या. ( इलेक्ट्रिक बेल वाजते. )

इंदिराः—( अरे मेल्या, पुरे कीं आतां तुझीं कलमें ! पिसाळा आण-लान् बाई ! ) आतां आपण जायचें गडे, बाई आल्याच वाटतें. ( इकडे तिकडे दचकून पहाते. ) छे बाई, आपण जायचेंच गडे ! बाई आल्याच ह्या—

वामनः—अहाहा ! हें चापल्य प्रथम वधूला कसलें येणार ! म्हणूनच तर ह्या सेकंडहँड बारगेनमध्यें शिरलों ! तें कांहीं नाहीं. हा आतां मी असा तुझा हात धरणार ! ( हात धरतो ) माझ्या प्रीतीचें तिकीट मी तुझ्या गालावर चिकटवून, आपली एंगेजमेंट रजिस्टर करणार. ( तो हात धरतो. ती नको बाई, नको बाई म्हणते. )

इंदिराः—चला आटपा लवकर गडे, आटपा गडे लवकर, चला गडे, असें एकीकडे तरी जाऊं या, कोणी पाहील बाई ! ( वामनराव व ती आंत जातात व लागलीच इंदिरा परत येते. ) पण बाई, फंड लवकर पाठवायचाहा !

वामनः—( आंतूनच ) हा आणला पहा. ( जातो. )

इंदिराः—काय ग बाई धुडगुस घातला मेल्यानें ! कांहीं कां असेना पांच हजारांची रिंग तर पटकावली. ( घंटा वाजते ) अग बाई, ही पण सांगतां कामा नये; थांबा आलें हो आलें. मेल्यानें आगगाडीच्या मागें काय फरफरत ओढलीन ! आकाशांत झेपलीनमध्यें काय नेलीन ! समु-द्रांत काय बुडवलीन, कलमें काय बांधलीन, काय नि काय मेल्यानें घामाघूम केलीन बाई ! माझें डोकें कसें कलकलून गेलें आहे. कुठें तरी निजतें बाई स्वस्थ जाऊन निवांत ! !

---

# अंक तिसरा.



## प्रवेश १ ला.



सीनः—( क्लबांतील लायब्ररी. )

**चंपाः**—या तुमच्या पुण्यास आल्यापासून पाहतें, तों भारीच गंमत बाई ! या समाजसुधारणेचे, स्त्रीशिक्षणाचे, लग्न जुळविणाऱ्या दलालांचे, व्याख्यानमालेचे, आमच्या लोकांच्या तऱ्हेवाईकपणाचे, एक का सांगू ? असे अनंत चमत्कार पाहिले. बाकी तुम्ही कांहींहि म्हणा गोपाळराव ! मला असें वाटतें कीं, आम्ही आपले परगांवचे लोकच बरे.

**गोपाळः**—यांत काय संशय ! खरोखर या गांवांत कुणाचा जोडा कुणाच्याच पायांत नाहीं; सगळे जोडे बदललेले ! दुसरें ठिकाणीं असें वाटतें कीं, पुणें म्हणजे सर्व सुधारणांचें, विद्वान व धूर्त लोकांचें माहेरघर; इथले रहिवाशी म्हणजे जसे कांहीं सगळ्या हिंदुस्तानाला अंधेरांतून प्रगतीचा मार्ग दाखविणारे प्रतापी सूर्यच ! पण माझा तर अनुभव असा आहे कीं, यांच्या सारखी आपसांतली खेटराखेटरी दुसरीकडे कुठेंच नसेल, हेच प्रतापी सूर्य अंधेरांत चांचपडत पडले आहेत; यांनाच मार्ग सांपडेना ! सगळ्या सुधारणेचा धुडगूस येथें जरूर एक वेळ पहावा अशी माझी प्रत्येकाला शिफारस आहे !

**चंपाः**—खरेंच, एवढें मोठें शहर पण भारीच बाई घोटाळे आहेत हो इथें ! समाजाच्या पुढारी लोकांचें माहेरघर ना हो हें ?

**गोपाळः**—कसलें घेऊन बसलीस माहेरघर आणि पुढारी ! अग प्रत्येकाजवळ दोन दोनशे मशालजींचा सरंजाम आहे.

**चंपाः**—कशाला तो ?

**गोपाळः**—पुढाऱ्यांच्या तोंडावरून मशाली ओवाळायला ! सगळे गुळाचे ! गणपती नि नैवेद्य ! आतां नाहीं म्हणायला असतील थोडे कळकळीचे, पण काय भोंवतालच्या मुसंडीपुढें त्यांचें काय चालणार ! नुसती

हमरीतुमरीला सुरवात झाली कीं, हे भोंवतालचेच मशालजी एकमेकांचीं तोंडें भाजीत सुटतात !

चंपाः—खरेंच बाई ऐकावें तेवढें नवीनच ! सगळ्यांनीं एकी करावी असें नुसतें बरळायचेंच का मग ? आणि इथें पहातें तों दिव्याखालीं सगळा अंधेर.

गोपाळः–तूं नवीन आली आहेस ! ह्या डोंगरांत अशीं कांहीं अंधाराचीं भुयारें आहेत कीं, तिथें सूर्याचे किरण देखील पांढऱ्याचे काळे होतील ! सांगूं का तुला ! वकिलांचीं भुयारें, डाक्टरांचीं भुयारें, वैद्यांचीं भुयारें, म्युनिसिपल व्यवस्थेचीं भुयारें, शिक्षण संस्थेचीं भुयारें, लोकपुढाऱ्याचीं भुयारें, एडिटरांचीं भुयारें ! अशीं अनंत भुयारें आहेत त्यांत किती अंधार आहे याची कल्पना देखील तुला नाहीं होणार. ब्रह्मांड आहे !

चंपाः—असें, असें ! ब्रह्मांड उत्पन्न व्हावयाच्या आधीं जसा अंधेर होता, तसाच कां म्हणानांत ! बरें, पण या गांवांत व्यापार देखील मोठासा दिसत नाहीं मुळींच !

गोपाळः—हं, इथें मात्र चुकलीस ! इथल्या सारखें व्यापारी शहर दुसरें कोणतेंच नाहीं. व्यापारी गिरण्यांचा माल किती आहे म्हणून सांगूं! सिंहगडायेवढे ढीग पडले आहेत !

चंपाः—कसला व्यापार आहे तरी बाई इथें येवढा ?

गोपाळः–लग्न-मुंजींचा नि कारकुनांचा. एकेका मुहुर्तावर हजार हजार जोडपें तयार होऊन पडतें आहे, तसेंच कारकुनांच्या गिरण्यांतून दहा दहा हजार कारकून, स्वयंपाकी, हमाल, टांगेवाले तयार होऊन पडताहेत ! निर्जीव वस्तूंच्या शेंकडों गिरण्या असतात, पण असल्या जिवंत मालाच्या गिरण्या कुठें आहेत दुसरीकडे ? कच्च्या मालाचे ढीग पर्वतीयेवढाले जागोजागीं अजून पडले आहेत ! जाऊं द्या झालें ! हें चालायचेंच आतां !

चंपाः—बरें पण आज वर्तमानपत्रांत काय नवीन खबरबात आहे ती पाहिलींत कां ?

गोपाळः–असायचें काय ? नेहमींचें गुऱ्हाळ ! दहा पांच नारू,खरूज,मलमपट्टीच्या जाहिराती ! वधू पाहिजे, वर पाहिजे, मुलगा हरवला, बाप गमावला, सासरा पळाला इत्यादि, इत्यादि. तसेंच उन्हाळा फार आहे, थंडी

थोडी आहे, पावसाळा मुळींच नाहीं, लोक हवालदील आहेत, झालें, इटुकली मिटुकली गोष्ट ! सगळ्यांत सोपा धंदा एडिटरचा बोवा !

**चंपाः**—कांहीं कां असेना, कागदाची तर अगदीं समृद्धि झाली आहे; किती तरी वर्तमानपत्रें आहेत हीं, सूर्य, चंद्र, प्रकाश, अंधेर, प्रतोद, चक्षु, लांडगा, कोल्हा, सिंह, पंजाबी, मद्रासी, खैंच उडाली आहे. वाण्यांची चंगळ आहे झालें; सगळीं आंत बाहेर जाहिराती व नोटिसा ह्यांनींच भरलेली आहेत.

**गोपाळः**—एडिटरांच्या नि कंपाझिटरचे पाठीवर नाहीं जाहिराती छापूं लागले अजून हें नशीबच ! एडिटोरियलच्या नांवानें मोठ्याशा भोपळ्याएवढें पूज्यच असतें ! बहुतेक प्रासंगिकबोल नि उपयुक्त माहिती यांनींच लडबडलेलीं असतात.

**चंपाः**—सगळ्या जगांतील तारायंत्रें जशीं कांहीं यांच्या कानांतच कोंबलेलीं असतात !

**गोपाळः**-हं ! हळू बोल, एखादा एडिटर येथवर लांब कान करून ऐकून जायचा नि हेंच छापायचा ! एक टकल्या एडिटर तर आपल्या डोक्याच्या टकलावर देखील जाहिरात देणार आहे म्हणे !

**चंपाः**-देतील मेले काय नेम त्यांचा ! काय तरी त्यांची माहिती पण ? काय म्हणे, सदर्न मराठ्याच्या मिटर गेजचें ब्रॉड गेज करण्याचा विचार चालू आहे ! खंडाळयाचा घाट पाडून सपाट केल्यास शेतकीखात्यास जास्त मदत होईल ! असें तज्ञाचें मत आहे ! मी म्हणतें रेशमी पगडीऐवजीं नुसतेंच शेणकुटाचें खोकें डोक्यावर वापरल्यास अर्थशास्त्राच्या दृष्टीनें फायद्याचें नाहीं कां होणार ? एकंदरींत काय ! धुडगुस घातला आहे मेल्यांनीं झालें !

**गोपाळः**—अग आणखी नाहीं ऐकलीस वर्तमानपत्रें भरून काढावयाची युक्ति ? सूर्य नऊ कोटी मैल लांब आहे, अमेरिकन बाई दीडशें वर्षें जगली; सरड्याची जीभ एक पूर्णांक पांच दशांश इंच लांब असते ! मला जर कुणीं छापूं दिलें असतें तर मीं छापलें असतें कीं—प्रत्येक मनुष्याच्या माकडहाडाची लांबी दोन इंच असते, तेव्हां पांचपंचवीस एडिटरांच्या माकडहाडांची लांबी एका गाढवाच्या शेपटीएवढी होईल ! !

**चंपा**—खरेंच गडे, आणि यांची आपसांतली लाथाडी जर ग्रामोफोन व सिनेमांत घेतली तर पैसेहि रगड मिळतील. कायहो, पण या क्लबांत इतकीं वर्तमानपत्रें घेतात तीं वाचतात तरी का इथल्या बायका ?

**गोपाळः**—अग कोण बसलें आहे वाचायला ! सरासरी वेणीफणीचें साहित्य, नवीन फॅशनची पोलकी, कांहीं पुनर्विवाहास तयारच्या जाहिराती वगैरे. फार झालें तर औषधांची यादी आणि डाक्तरसुइणींचे दोन चार पत्ते ! संपलें वाचन त्यांचें !

**चंपाः**—इश्श ! काईबाईच बोलणें बाई ! इतके पत्ते देखील का वाचून ठेवावे लागतात. जाऊं दे बोलणें आतां. बरें, आतां आपण आपल्या स्वतःच्या विषयाकडे वळूं या शंकररावांच्या नादीं लागून आपल्याला किती दिवस झाले; यामध्यें स्वार्थ ना परमार्थ.

**गोपाळः**—काढलास का पुन्हां हा वादग्रस्त विषय ? मी तुला कितीदां तरी बजावलें कीं शंकररावाला राधा मिळालीच पाहिजे.

**चंपाः**—पण शंकराला राधा मिळाल्याचा आधार पुराणांतरीं तरी आहे का ? कांहीं शास्त्राधार आहे का ?

**गोपाळः**—कोण त्या ग्रंथावर विश्वास ठेवतो ! कंदमुळें खाऊन सोमरसाच्या तारेंत लिहिलेल्या ग्रंथाचा आधार कलियुगांत मुळींच मानूं नये, असाच धडधडीत शास्त्राधार आहे; असें जर नसतें तर पुनर्विवाहाच्याबद्दल इतकीं रणें नि लढाया का झाल्या असत्या ? तें कांहीं नाहीं तुझी मदत यांत तूं मला दिलीच पाहिजे.

**चंपाः**—तें सगळें खरें, पण मनुष्याच्या मूर्खपणाला कांहीं तरी सीमा हवी ना ? त्या दिवशीं त्यांना उभयतांना नाटकाला पाठवायचा कसा पण चांगला योग आणून दिला होता. पण हें नाटकच चांगलें नाहीं, तेंच चांगलें नाहीं, अशी नसती टीका करायची. कांहीं जरूर ! तें राहूं दें. राधाबाईंचीं जुनी ओळख उकरून काढायची कांहीं पंचाईत ! गोविंदरावांनीं तर, त्या दिवशींचें वर्तन पाहून पुन्हां शंकररावांचें तोंड पाहूं नये असा निश्चय केला आहे.

**गोपाळः**—अग तूं कां इतकी उगीच रागावतेस ? मी त्याला थोडा कां बोललों. पण—पण आहेना. शिवाय हें पाहिलेंस कां ? ( पैसे दाख-

ते.) हें आहेना ? हा सोनेरी पदर झांकण घातला म्हणजे त्याच्या ाली वाटेल तें दडवतां येतें ! मग तिथें प्रश्नच उरत नाहीं; ह्या सोनेरी दराच्या आड म्हतारेकोतारे थेरडे देखील लपून जाऊन आपग रंग पालटतात ! डोक्याचें बिलिअर्ड टेबल जरी झालें असलें तरी सोरी अच्छादनानें त्याचे सगळें केस पुन्हां फुटतात. पुन्हां क्रिकेटचें टर्फच ोतें कां म्हणेनास ! सासूच्या पाठीवर सुवर्ण प्रयोग केला म्हणजे म्हाताया जावयाची उसण बरी होते. एकंदरींत काय, थेरड्या जावयांच्या सर्व याधी हरणार्थ, सुवर्ण, रौप्य, वंगेश्वर ह्या मात्रा सासू, सासरा, करवल्या, इत्यादिकांस सपाटून उगाळून दिल्यास थेरड्या जांवयाचा संधिवात, दृष्टिमांद्य, शरीरकंप, अतिसारादि दुर्धर रोग देखील साफ बरे होतात! मग शंकरराव तर तरुण बांड आहे ?

चंपाः—मी बाई कशाला उगीच तुमच्या आड येऊं ? ( पैसे घेते ) बरें पण माझी बुद्धि तर आतां अगदीं कुंठित झाली आहे ! आतां ही जुळवाजुळव कशी करावी हें मला तर कांहीं बाई समजत नाहीं पण अगदींच कशी नाहीं त्यांना काडीइतकी अक्कल ? आतां पर्यंत त्यांची कशीबशी अब्रू मीं राधाबाईच्याकडे राखली ! ते मुद्दामच हंसायसारखें करतात, मी आज असें करणार आहें म्हणून आधींच सांगून ठेवतात, वगैरे वगैरे त्यांच्या मूर्खपणावर शेंकडों पांघरुणें मी घालतें! पण आतां मात्र फसणार खास ! आतां बाई युक्ति तुम्हीच काढा शोधून ! का तुम्ही देखील टेकीस आलां ना ?

गोपाळः—युक्तीलाग काय कमी ! हें बघ, केशवरावांचा इथें खटला आहे ना ? त्यांच्या वडिलांच्या मृत्युपत्राची कायशी त्या वकिलाच्या दुकलीशीं घासाघीस चालली होती ना ? काय लेकाचा ऊत आला आहे या वकिलांना जिकडे तिकडे ! संध्याकाळीं पगडीच्या कोकींत गजरे घालून समोर दिवे लावीत नाहींत येवढेंच कायतें !

चंपाः—बरें पण कागदपत्रांचें काय ? त्यांची ती ट्रंक आंत आहे खोलींत तिकडे !

गोपाळः—असायचें काय ? ती कागदपत्रांची पेटी दाखीव म्हणजे

आटपलें ! माझ्याकडे लागलें बाकीचें काम ! तेवढें मृत्युपत्र हस्तगत झालें कीं झालें ! कीं चाललेच केशवराव सातारला हुडकायला !

चंपाः–राधाबाईचा कल शंकररावाकडे आहे खरा ! पण बाई, इतक्या धांदलीनें लग्न कसें होणार ! त्याला कांहीं जमवाजमव नको कां करायला?

गोपाळः—वेडीरे वेडी ! अग, अलीकडे पश्चिमेकडून सुधारणादेवी कशी झपाट्यानें दुगाण्या झाडीत पुढें पळत आहे, तें तुला मुळींच ठाऊक नाहीं वाटतें ? गहाणखतासारखें लग्न नोंदवून घ्यायचें, रजिस्टर करायचें, समजलीस ? आंगठ्याचा छाप देऊन, ' मी तुझा पोपट, तूं माझी मैना ' असें त्रिवार म्हणायचें कीं लागलीच संसारसमुद्रांत आगबोट ढकलायची ! नवरानवरीला ऐपत असली तर पैशाच्या एकमेंकांच्या गळ्यांत माळा घालून, चार चिमण्या कावळे जेवायला बोलावलें कीं उडाला बार लग्नाचा ! ही आपली चटावरची एक तऱ्हा आहे !

चंपाः—इश्श बाई ! बरें पण एक तऱ्हेनें—नवराबायकोंची उगीच कुचंबणी तरी फार दिवस होत नाहीं अशानें !

गोपाळः—बरें, तें जाऊं दे हें सगळें ! आधीं ती ट्रंक कुठें आह ती दाखिव ! (सुंदराबाई, तारा, दामिनी, इंदिरा, राधा, यमुना प्र० क.)

सुंदराः—तें कांहीं नाहीं, समसमान हक्काचा ठराव पास झालाच पाहिजे ! इतकेंच नव्हे, तर ताबडतोब अमलांत देखील आणला पाहिजे. नुसते एकटे पुरुषच हक्क पटकाऊन बसणारे कोण ग सुडके ? मी आणतें हा ठराव पुढें पहातें कोण नाक मुरडतें तें ! मेल्यांचें नाकच चिरून टाकतें !

ताराः—आपल्या स्वतःच्या बायकांना हक्क देववत नाहींत नि आपल्याला हक्क मागायला धावले मेले सरकाराकडे लुब्रे ! लाजा नाहीं वाटत ! स्वराज्याचे हक्क पाहिजेत मेल्यांना !

दामिनीः—खरेंच गडे, कायग ! हें आज दहा वर्स मेले मवाळ, नि जहाल मांजरासारखें कळवंडताहेत; कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत नाहीं ! पाहिजे तरी काय मेल्यांना ? कळेना नि वळेना !

सुंदराः—त्यांना पाहिजे आहे आकाशांतला चंद्र खेळायला हो ! विलायतेंतले मोरूकाका देखील रागारागानें म्हणत होते.

दामिनीः—हें नॅशनॅलिझम् म्हणजे कायग ?

सुंदराः—डॅांबल भेल्यांचें ! मी सांगूं का ? दरवर्षी उंची उंचीं पोषाख ावयाचे, सेंकड क्लासमध्यें बसायचाचें, मांडवांत अडमडून एकमेकांशीं ्या घ्यायच्या, खुर्च्या, टेबलें, एकमेकांच्या डोक्यांत मारायचीं, णि खोचा पाडून त्यावर मलमपट्टी बांधून घरीं यायचें ! मार खाऊन र मोडली, म्हणजे अंबेहळद लावून शेकतात ना ? तेंच नॅशनॅलिझम् हो !

ताराः—इश्श, ऐकावी ती आपली गंमतच ! बरें पण, कांग्रेस कमेटी णजे तरी काय ?

सुंदराः—म्युनिसिपॅलिटीची वडील बहीण हो ! त्याचें असें आहे कीं, न तट असतात, त्यामध्यें दोन हुषार माणसें असतात, आणि प्रत्ये- ंच्या कांखेंत पांचपंचवीस बावळटें असतात. हे सगळे बावळे एकामेकांशीं द घेतात. मग थोड्या वेळानें मुद्याची गोष्ट बाजूलाच राहून गुद्यावर हे लगावून हातांतलें काम तसेंच लोंबत टाकून घरोघर निघून जातात. ी मोठ्या स्वराज्याची धाकटी रंगीत तालीमच म्हणेनास ?

राधाः—बरें, पण स्वराज्य म्हणजे तरी काय ?

सुंदराः—म्हणजे विग्रहरण ! कळलें ना ? सगळयांनीं मिळून मंगल- ार्य डोक्यावर घ्यायचें हो. सोप्या शब्दात सांगूं का ? स्वराज्य म्हणजे ोपळा !

राधाः—चला, तुम्ही सगळें थट्टेवारीच नेता बाई ! बरें, पण नॅशनल एज्युकेशन म्हणजे तरी काय ?

सुंदराः—म्हणजे सैंपाक करायचा, आधणांत तांदूळ वैरायचे, नि पोळ्या लाटायच्या !

ताराः—एक तरी उत्तर धड आहे कां ? बरें. पण युनियन, युनियन म्हणतांना नेहमीं ऐकतें, तें म्हणजे तरी काय ?

सुंदराः—रानांत मेलेल्या जनावरावर हुकी करून चोंहींकडून चार

कोल्हीं जमतात आणि मग सिंह किंवा वाघ दिसला म्हणजे एक विचारानें सगळे पळून जातातना, त्यालाच युनियन म्हणतात हो !

**यमुनाः**—कॉंप्रोमाईज म्हणजे असेंच कांहीं तरी सांगतील, मी नाहीं बाई विचारीत उगींच !

**सुंदराः**—तूं कशाला विचारतेस ? मीच सांगते. चार चोहोकडे रस्त्यावर फडकीं मांडून भीक मागतात तशी न मागतां एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून आंधळे लंगडे एकादशीस भीक मागताना तूं पाहिलेस ना ग तारे ? हँ ! त्यालाच कॉंप्रोमाईज म्हणतात हो !

**यमुनाः**—इतका मेला पुरुष पुढाऱ्यांचा राग धरून कसें चालेल ?

**सुंदराः**—तें कांहीं नाहीं, आम्हांला सारखे हक्क दिल्याशिवाय मला मुळींच त्यांची कींव नाहीं यावयाची !

**यमुनाः**—अहो पण बाई ! त्यांनीं कुठें नाहीं सुरवात केली हक्क द्यायला ? दोन मिशा अर्ध्या अर्ध्या भादरून एकाच मिशीचा ऐवज नाहीं का ते ठेवायला लागले ? बायकांच्या हक्काबद्दल एक मिशी काढलीच नाहीं का ? हळू हळू दुसरीही काढतील !

**सुंदराः**—तें कांहीं नाहीं. बायका आणि पुरुष अगदीं अगदीं समसमान झाले पाहिजेत. जाऊं दे बाई ! त्या मेल्यांचें गुऱ्हाळ. कोळसा उगाळावा तितका काळाच ! चला तिकडे गेस्टरूममध्यें जाऊं या. प्रो. रांडुबाई दळुबाई इश्श मेले, आज मुद्दाम मुंबईहून आपल्या क्लबांत गेस्ट आले आहेत, त्यांचें व्याख्यान आज आहे हिंदुस्थानच्या उन्नतीबद्दल. सगळी तयारी करून ठेवूं या. ( सुंदरा तारा वगैरे जातात. )

**इंदिराः**—ह्या बाईच्या सहवासानें माझें मन आताशा कसें विरस पावूं लागलें आहे. मी मलाच मोठी रंगेल, हौशी समजत होते. पण हिची माझ्यावर देखील ताण आहे. मला तर हा सगळा प्रकार पाहून थक्क वाटतें. ह्या सुधारणेच्या विश्वस्वरूपांत मी तर अगदीं बाई गांगरून गेले आहे खरेंच एखादें चांगलेंसे प्रेमळ सगुण रूप पाहून त्यालाच चिकटून रहावेसें वाटतें ! मी तरी काय करूं; माझें मनच मुळीं थाऱ्यावर नाहीं.



शंकरः—अरे वा त्रिंबकराव, तुम्हीं तारवाले केव्हांपासून झालांत ?

पद—( पानिया जो भरन )

न कळे बाई केविं कसें मन मोहुनिया गेलें ॥ निष्ठुर कटु वच जरि वरि वदलें, अंतरिं परि हो भुकेलें ॥ध्रु० ॥ कळत कळत हृदिं शिरुनि चोरें, लुटिलें प्रेमधनासि ॥ नवल परी बाई ! द्विगुणित उलट मजजवळी तें ठेलें ॥ १ ॥

## प्रवेश २ रा.



सीन—( चहावाला व गणूसंगित्या प्रवेश करतात. )

चहावालाः—काय करावें ! या लोकांना एक प्रकारची फुकट खायची संवयच झालेली दिसते ! खायच्या प्यायच्या वेळेस मात्र अशी ओतप्रोत श्रीमंती दाखवितात कीं, जसे कांहीं लेकाचें कुठले जहागिरदारच आले आहेत ! पण बिल द्यायच्या वेळेस लागले तोंडें लपवायला ! आज पंधरा दिवस सारखे खेटे मारतो आहें बिलवसुलीला ! पण निम्मी देखील अजून वसुली झाली नाहीं ! ह्या लेडीज क्लबांतच पंचवीस रुपये बिल राहिलें आहे, पण तें मिळणार कसें ? चाळीस हेलपाटे मारिले, पण दादच लागत नाहीं ! अरे हो, तो आमचा रंगेल गणूसंगित्या पहिल्यानदां गांठावा म्हणजे सगळें ठीक जुळेल ! पण हा बेटा कुठें सापडणार ! त्याची गांठ कशी पडणार ! हो ! हो ! त्या क्लबांतल्या सगुणा मोलकरणीच्या कोठडींत, कवनें करीत पडलेला असायचा. ती सगुणा कशी रंगीत भिंगरी आहे पण ! आहे खरें लेकाचें नशीब ज़ोरावर ! तर चला त्याला तिथेंच प्रथम गांटूं. अरे वा ! पण हा पहा आलाच; शंभर वर्षें आयुष्य आहे बेट्याला, आठवण काढतांच हजर. अरे गणू ! मरेतोंपर्यंत आयुष्य आहे बेट्या तुला !

( गणू प्रवेश करतो, व तसाच पुढें चालूं लागतो. )

चहा०ः—अरे गणू ! अरे गणू !

गणुः—चलरे, मला आतां वेळ नाहीं तुझ्याशीं बोलायला.

चहाः—बरें आहे येशील लेका दुकानांत !

गणुः—अररर, उगीच चहा तुडायचा ! (त्याला जवळ घेऊन येतो) अरे अशी डोक्यांत राख काय घातलीस ? आज कीं नाहीं इतकें काम पडलें कीं, निवांत जाऊन मरायला देखील मला फुरसत मिळाली नाहीं !

चहा०:—सगुणेनें हक्काची रजा घेतली वाटतें ?

गणुः—चल वात्रट कुठला ! बरें पण तुझें काम काय आहे तें तर सांग आधीं ?

चहा०:—हें पहा, आज चार महिने झाले, तुझ्या क्लबाकडे पंचवीस रुपयांचं बिल राहिलें आहे, तेवढें कसेंहि करून तूं देववशील—तर पहा बोवा ! मी तर खेटे मारून मारून दमून गेलों.

गणुः—( हंसतो ) तुला कवडीही मिळावयाची नाहीं !

चहा०:—अरे असें काय हंसण्यावारी नेतोस ? तें कांहीं नाहीं. तूं माझ्याकारितां एवढी खटपट करच कसेंहि करून ! मी कांहीं तुझा उपकार विसरणार नाहीं पहा ! तुझा वशिला आहेरे इथें चांगला ! तसेंच ह्या चांगल्या शिकल्यासवरलेल्या आहेत ! तूं सांगितलेंस तर खात्रीनें पैसे मिळतील. पहा बोवा !

गणुः—अचरट आहेस झालें ! अरे ह्या—

पद—( नको जिवा भवाची )

ह्या शिकूनि शिकुनि उगाचि लचकति ललना ॥ ध्रु० ॥
नट्यापट्यांत दंग, मुखिं तांबूल रंग, वर्णुं ढंग कितीतरि
नाना ॥ १ ॥ गृहिं शिशू रडे, त्यासि घेति ना कडे ॥
नच देति तया स्तनपाना ॥ २ ॥ नच केरासि वाण, घरिं
चुलिपुढं घाण ॥ सैंपाक मुळिं न ये त्यांना ॥ ३ ॥ नच
विद्या घडे, नच संसार घडे ॥ वटवाव्रळापरिस ह्या जाणा ॥४॥

चल चालता हो ! तुझा बाप जरी आला तरी कवडी सुटायची नाहीं
ा हातून; बरें आतां तूं म्हणतोस तर चल. चांगली प्रथम तुझ्या

दुकानांत एक शेर बासुंदी चापून, बघतों प्रयत्न करून, नशीब तुझें !

चहा॰ :—गोडाजीच दिसतोस कीं ! चल लेका ! करतां कसें !

---

# प्रवेश ३ रा.



सीन—( केशवरावाचें बिऱ्हाड. )

केशव :—हें बघ तूं असें खिन्न वदन केलेंस तर मला कांहीं सुचत नाहीं ! तें कांहीं नाहीं. तें मनोहर हास्य, तो प्रफुल्लित चेहरा पाहण्याक-रितां माझें मन कसें अधीर झालें आहे ! हं, राधे हंस एकदाची म्हणजे मला आनंद वाटेल ! राधे हंसतेसना ?—

पद—( मजवरी समजुना )

राधिके मधुर स्मित अधरिं धरी ॥ चंचल लोचन खरशरिं सुंदरि टोंचि न मज वरिवरी ॥ ध्रु० ॥ भृकुटि लास्य, मधुर हास्य, नयन खेळनांही ॥ मंजुळ वद वचनें ॥ प्रेमळतेनें नट जाशि श्रीनवरी ॥ १ ॥

तूं कां उलट वाईट वाटून घेतेस ? त्याचा सर्व खुलासा झाला आहे, तु-झ्याकडे मुळींच दोष नाहीं. डोन्ट बी सॉरी !

राधा :—( माझें खेटर अडलें आहे सॉरी व्हायला. ) बरें पण, आ-पल्या फ्रेंडशिपबद्दल आतां मात्र मुळींच संशय राहिला नाहींना ? नाहीं तर वेळेवारींच सांगा ! माझ्या ऑनेस्टीचें प्रूफ आहे माझ्याजवळ !

केशव :—नो नो, आय ॲम कनव्हीन्सड्, अगदीं खात्री झाली आहे.. चंपे, ती कागदपत्रांची पेटी आण पाहूं ! ते वकील आत्तां येतील. त्यांना तेवढे कागद दाखविले पाहिजेत. ( चंपा पेटी आणते व तो धांदलीनें हुडकतो. ) म्हणजे चंपे ही ट्रंक तूंच ना भरलीस ? मीं तुला बजावून सांगितलें होतेंना कीं, कागदपत्र नीट संभाळ म्हणून ? काढ ! काढ ! शोधून. काय ठेविलेस कुठे ?

चंपाः—अग बाई माझे !

केशवः—कायग आई माझे ! घातलास का बोळ कागदपत्रांना ?

चंपाः—छे, ह्या चोळ्यांचे पोटीं देखील नाहींत ! त्या कपाटावर तर विसरून राहिले नाहींत ना ?

केशवः—काय नाहींना सांपडत ? मला वाटलेंच तरी अशी कांहींतरी घालमेल होईल म्हणून ! ह्या बायका म्हणजे अशा जिथें तिथें तिळ्यावर पडतात. दहादां बजाऊन सांगितलें कीं, नीट ठेव—नीट ठेव म्हणून ! सांग, ठेवलेस कुठें ?

चंपाः—त्या थोरल्या कपाटातच विसरून आलें वाटतें ! छे, सगळें त्रिभुवन धुंडाळलें ! तिथेंच विसरलें.

गोपाळः—( प्रवेश करतो व चंपेकडे पाहून हंसतो. )

केशवः—ह्या पुण्यास आल्यापासून सारखी साडेसाती लागली आहे माझ्यामागें ! परवांची तारीख आणि कागदपत्रेंच नसलीं तर काय मोठ्यानदां गळा काढून रडूं त्या जज्जापुढें !

चंपाः—काय करायचें बाई, होऊं नये पण झाली खरी चूक ! एक वेळ वाटतें कीं, मीं वुइल आणलें म्हणून. पण जर इथेंच नाहीं तर तें कपाटांतच विसरलें वाटतें ! छे ! आतां काय करायचें बाई तरी ? ( गोपाळाकडे पाहून हंसते. )

राधाः—दुसऱ्याला कशाला बोल लावावा ! इतकें महत्त्वाचें वुइल होतें तर, स्वतः कां नाहीं सगळे कागद तपासून घेतले. आपण वेडेपणा गयाळपणा करायचा आणि उगीच दुसऱ्याला नसता उपद्याप नाहीं तो ! कागदपत्रें पाहून बरोबर घ्यायला कुणीं हात का धरले होते !

केशवः—अग होय ! चूक झाली माझी खरी ! पण कांहीं विश्वास देखील टाकला पाहिजे ना दुसऱ्यावर ? छेः तें कांहीं नाहीं ! मला लागलीच आतां सातारला ह्याच गाडीनें प्रोसीड झालें पाहिजे; नाहीं तर हातची केस जायची ! चंपे जा, जा, लवकर ! त्या भैय्याला टांगा सांग पाहूं आणायला. जा सांग लवकर, तसेंच राधाबाई, तेवढे दोन शर्ट बॅगेंत घाला पाहूं !

**राधाः**—काय पण बाई, प्रेम करतों–प्रेम करतों असें सारखें तोंडानें म्हणायचें; पण पायावर जसें कांहीं चक्र पडलेलें ! असला हा नेहमींचा प्रवास मला तर मुळींच खपणार नाहीं. साफ सांगतें, जा, घ्या जा तुमचे शर्ट तुम्हींच !

**केशवः**—तें खरें, पण कांहीं जरूरीचें काम तर पाहिलें पाहिजे ना ? बरें बोवा मीच शर्ट घेतों. ( भैय्या आंत ओरडतो. अरे महाराज, घोडवा का टंगवा लाईन है ! )

**राधाः**—अरे मेल्या, सरळ घोड्याचा टांगा म्हणायचें तें घोडवाका टंगावा केलान् मेल्यानें ! अडाणी मेला. ( केशवराव जाण्यास तयार होतो. गोपाळराव हातांत मृत्युपत्र घेतो. शंकरराव प्रवेश करतो व तें तो पाहतो. )

**केशवः**—ठीक आहे. मी येतों तर–आहे म्हणा अजून एक तास अवकाश ! या शंकरराव !

**गोपाळः**—( जा खुशाल सातारला मरेतोपर्यंत मृत्युपत्र शोधा. अररर, ह्या शंम्यानें पाहिलें वाटतें ! )

**शंकरः**—कायरे आहे तें ? कसलारे कागद तुझ्या हातांत ? अरे चोरा, दाखीव दाखीव पाहूं मला !

**गोपाळः**–( आतां काय करावें या नर्मद्याला ! )

**शंकरः**—कां, तोंडसें बंद केलेंस ? नाहीं तर माझ्यावर तोंड सोडतांना कशी जीभ वळवळत असते, कां बोलना आतां ? ( कागद मागूं लागतो. )

**गोपाळः**—कांहीं नाहीं, तो आपल्या घरखर्चाचा खरडा आहे झालें. घरचा जमाखर्च काय करायचा आहे तुम्हांला !

**शंकरः**–एक्स्लेंट ! ह्या केशवरावाला आमचा दरमहाचा खर्च दाखवून त्याचा नकशाच उतरतो ! त्याला वाटतें, मीं सगळ्या श्रीमंतीच्या त्याला थापाच दिल्या ! आणरे तो इकडे गोपाळ ! हें पाहिलेंत केशवराव ?

**गोपाळः**—( झालें काम ! पाडतो आतां हा मला तोंडघशीं ! छे पळायला वाट देखील नाहीं. )

शंकरः—हं, चल पुरे झाले ढोंगधतुरे ! आण कुठे आहेत कागद ! ( जवळ जातो व त्याच्याकडून हिसकून घेतो. )

गोपाळः—जाऊन द्याहो ! पुन्हां केव्हां तरी वाचा सावकाशीनें. सगळा गिचमीड लिहिलेला आहे तो. ( त्याला दाबतो. )

शंकरः–( न समजून ) अरे पण माझा जमाखर्च मी केशवरावला दाखवतों. त्यांत तुझ्या बापाचे काय तीनचवल खर्च होतात ? बेशरम कुठला ! हा गाढव नेहमीं माझा असा, दुसऱ्यांच्या देखत उपमर्द करीत असतो. ( मारतो व हिसकावून घेतो. ) हें पाहिलेंत का केशवराव ? पहाच एक वेळ मी म्हणतों तें खरें कीं नाहीं.

गोपाळः—अहो शंकरराव ! पहा–पहा–बरें ! अहो एक क्षण थांबा ! अहो अगदीं गिचमीड आहे ! तुम्हांला नाहीं लागणार तें ! इकडे तरी आणा, मी दाखवतों तुम्हांला वाचून !

शंकरः—अरे अचरटा, तूं मला दाखवतोस का वाचून ! तुझें अक्षर तुझ्यापेक्षां मला जास्त सफाईनें लागतें कीं नाहीं तें तूंच पहा ! मूर्ख ! बेशरम !

गोपाळः–( काय करावें आतां ह्या नरमद्यापुढें ! अहो, थांबा थांबा तर खरे ? )

केशवः–शंकरराव, छे, वेळ झाली गाडीची. पुन्हां केव्हां तरी वाचून पाहूं !

शंकरः—छे छे ! अजून अर्धा तास अवकाश आहे. प्लीज वन् मिनिट ओन्ली, ( वाचूं लागतो ) " मृत्युलोकची संसारयात्रा क्षणभंगुर आहे, करितां मी रामचंद्र गणेश सातारकर ह्या मृत्युपत्राचें द्वारें ! " अरे गाढवा गोपाळा ! मी जमाखर्चाचें, आणि केव्हां आणि कशालारे मृत्युपत्र लिहिलें ? ह्या मूर्खाच्या नाहीं नाहीं त्या भानगडी ! कायरे बाबा ! कसल्या नाहीं नाहीं त्या रिकाम्या उठाठेवी तुझ्या ह्या ?

केशवः—माझ्या वडिलांचेंच हें मृत्युपत्र ! आणि ह्यांनीं कसें चोरलें ! अहो शंकरराव, तें इकडे दाखवा पाहूं.

शंकरः—अरे मूर्खा ! माझ्यावर चोरी घालून फाजित करणार होतास

काय ? हे घ्या केशवराव तुमचे कागद. ( केशवरावास देतो. ) यू कॅन हॅव इट मिस्टर केशवराव !

केशव:—ओ ! मेनि मेनि थँक्स मिस्टर शंकरराव ! ह्याच ह्याच कागदाकरितां हेलपाटा घालणार होतों ! एकंदरींत नमस्कार महाराज, तुमच्या या सुंदोपसुंदाच्या दुकलीला ! ( छे, आतां मुळींच इथें थांबूं नये. कोण हा रोजीं त्रास नि दंगा ! चला माझें काम झालें. आधीं वकिलाचें घर गाठावें. कोर्टाचा निकाल होतांच तडक सातारचा मार्ग धरावा. ठीक आहे कोपरापासून नमस्कार ! ( जातो. )

शंकर:—( गांगरतो व चूक झाली असें वाटून तोंड वेडेंवांकडें करून गोपाळरावाकडे पाहतो. ) झाली खरी चूक ! कबूल आहे, खराच मी दुर्दैवी ! पण अशी चूक मनुष्याच्या हातून सहज होणार नाहीं का ?

गोपाळ:—कोण नाहीं म्हणतो !

शंकर:—हें पहा, तूं असा रागावून कां पहातोस ? हें तुझें असें माझ्याबद्दल बेपर्वाईचें वर्तन पाहून मला असह्य वेदना होत आहेत.

गोपाळ:—ठीक आहे, मला दुसऱ्या दिशा मोकळ्या आहेत !

शंकर:—हें काय बरें, तूं माझा गोपाळ आहेस ना ?

गोपाळ:—नाहीं, मला तुमची जरूर नाहीं !

शंकर:—मग मला देखील माझी जरूर नाहीं ! हा मी आतां हिरकणी खाऊन प्राण देतों. ( खालीं बसून आविर्भाव दाखवितो. )

गोपाळ:—तुम्ही तुमचे पूर्ण मुखत्यार आहांत !

शंकर:—पहा–गिळूं ही हिरकणी ?

गोपाळ:—अगदीं बेलाशक !

शंकर:—बरें तर ! येतों बरें मी आतां ! बोलल्या चालल्याची क्षमा कर. मग काय, गिळूं ना हिरकणी ?

गोपाळ:—तुम्ही मुळींच असें मनांत कांहीं आणूं नका बरें शंकरराव ! हं, माझी आठवण असूं द्या बरें ? हं गिळा, गिळा लवकर आटपा कीं लवकर !

शंकर:—पण आपला कांहीं तरी अटीवर अजून तह होणें शक्य नाहीं का ?

**गोपाळः**—आतां शंकरराव, उगीच कशाला विषय बदलतां ? हं चला आटपा लवकर ! गिळा ! गिळली का ? अहो गिळा कीं !

**शंकरः**—अरे चोरा, पहिल्यानदां तुला मारतों नि मग मी मरतों ! ( त्याला हंसत धरतो. ) तें कांहीं नाहीं; माझें काम—

**गोपाळः**—पुरे काम तुमचें ! जोंपर्यंत या तुमच्या महाबलाढ्य सुप्रसिद्ध डोक्यांतून आपल्या तंगड्या आपल्याच गळ्यांत घ्यायच्या युक्त्या निघताहेत तोपर्यंत आपला हा अल्पमति पामर किती म्हणून तुमची विजार सांवरणार ? तें तुमचें काम नि तुम्ही दोघेंही पडा जाऊन खाड्यांत. मला मुळींच जरूर नाहीं !

**शंकरः**—अरे मला काय ठाऊक, तें मृत्युपत्र होतें तें !–

पद—( आनबान )

**प्राण, त्राण, करुनि देई जीवदान या जना ॥ ध्रु० ॥ करु भुवनीं प्रार्थना, वद तुझेविना कुणा ॥ चरणिं नमन दीन करित पुरवि याचना ॥ १ ॥**

हें पहा, तूं नेहमीं मला असेंच पेंचांत धरतोस ! बरं तें जाऊं दे. असेल माझी चूक ! देवदेखील नमस्कारानें प्रसन्न होतात ! ही पहा, क्षमा मागून साष्टांग नमस्कार घालतों ! आतां तर तुझा राग जाईलना ?

**गोपाळः**—छे, छे, आतां मात्र कृपा करून मला ह्या भानगडींत घालूं नका ! हा पहा मीच तुम्हांला साष्टांग नमस्कार घालतों.

( दोघेही एकमेकांस साष्टांग नमस्कार घालतात व पडदा पडतो. )

---

# प्रवेश ४ था.

—:०:—

**सीनः**—( रस्ता. )

**वामनः**—इंदिरेला माझ्या कॉनफरन्सच्या स्पीचचें ब्रीफ तयार करण्याला सांगितलें होतें, तेव्हां तिच्याकडे प्रथम जाऊन तिची गांठ घेऊन, नंतर मांडवाकडे जावें. तिला प्रसन्न करण्याबद्दल मी हरप्रयत्न करीत

आहें, पण तिच्या मनाचा मुळींच अजून थांग लागत नाहीं. माझ्या म्ह-णण्याला सम्मति आहे असें समजावें, तर तिनें तसा स्पष्ट रुकार मुळींच मला दिला नाहीं. नाहीं म्हणावें तर, तिचें कांहीं प्रसंगीं माझ्याशीं ममता-ळूपणाचें व लडिवाळपणाचें वर्तन, मला तर स्पष्ट रुकार दाखवीत आहे ! काय करावें, माझें मन कसें भ्रमिष्टासारखें गोंधळून गेलें आहे !

पद—( तदानि तदानि दीम )

कळे न मला हि का रमणी मन वळेना ॥ भ्रमत, श्रमत, मम मन, परम चपल ॥ ध्रु० ॥ गहन विपिनिं करि मृग-जालिं लोभुन ॥ बाण विकल, दीन हरिण जेविं भ्रमण ॥ १ ॥

---

# प्रवेश ५ वा.

—:०:—

**सीनः**—( बाग—इंदिरा, तारा, यमुना, दामिनी, चंपा, राधा, वगैरे )

**इंदिराः**—नानसेन्स ! आय हेट सच परासिसटंट टीजिंग. रोजच्या रोज बेअर तरी किती करावें बाई मनुष्यानें ! ( हाताच्या गोटाकडे व घड्याळा-कडे पहाते. ) हो ! पण वामरावचें टीजिंग जर बेअर केलें नाहीं, तर ह्या सगळ्या थाटाचा भुर्दंड भरायला वामनराव काय माझा ऋणकरी थोडाच आहे ! कांहीं नाहीं, चैन करायची आहे आपल्याला, तर त्यांना तोंड-सुख घेऊं दिलें पाहिजे. हे कोण ! वामनराव ! घेईल थोडा सूड आतां. अंः घेईना का ! आपणही थोडेंसें गोड गोड भाषण करून लावावें वाटेला. कॉनफरन्सना आज दुपारीं ? होय होय ! म्हणून स्वारी अगदीं टीपटो यु-निफार्ममध्यें आहे. तिथें जाऊन काय रडणार तें दिसतेंच आहे ! अलो ! कम अलॉंग डीअर वामनराव! आय ॲम सो व्हेरि ग्लॅड टू सी यू ! कम् ऑन, टेक युअर सीट ! ( वामनराव प्रवेश करतो व बसतो. )

**वामनः**—गुडमॉर्निंग माय डार्लिंग ! व्हॉट लेटेस्ट न्यूज ! कसें काय, माझ्या सभेंतल्या भाषणांचें रफ स्केच केलें नाहीं का आपण ?

इंदिराः—हो हो, आपली आज्ञा कशी मोडीन ! सगळें ब्रीफ अगदीं तयार करून ठेवलें आहे. यू कॅन रीड इट, इफ यू लाइक ?

वामनः—व्हाय नॉट ! आय मस्ट रीड इट. इतक्या सुंदरशा अंतःकरणांतले विचार, सुंदरशा स्वीट हँडनें इतक्या ब्यूटीफूल कमॅडिंग टोनमध्यें ग्रथित केलेल्या वाक्यरचनेंत वाचणें, कुणाला आवडणार नाहीं ? ऐक तर प्रथम तूंच, व आणखी कांहीं चूक असल्यास करेक्ट कर म्हणजे मला पाठ करायला ठीक पडेल ! " आमच्या हिंदु धर्माप्रमाणें आमच्या पवित्र गीतेची शपथ मी राजानिष्ठेबद्दल घेतों. मी राजनिष्ठ आहें. राजनिष्ठ नसणारी एक व्यक्ति असो, प्रांत असो किंवा देश असो, तो देश, तो प्रांत किंवा ती व्यक्ति परमेश्वराच्या अवकृपेस पात्र होऊन तिचा नाश झाल्याशिवाय रहाणार नाहीं. " अलो ! माय ! डार्लींग, व्हाट ए पावरफूल ऑनेस्ट फ्लो ऑफ लॅग्वेज ? आय ॲम सिंप्ली वंडर स्ट्रक !

इंदिराः—ओ डोन्ट प्रेज मी ! आम ॲम बट युअर प्यूपिल. वेल, प्रोसीड फर्दर ! ( तो खुर्ची जवळ घेतो व ती मागें सरकते. ) नो, नो, प्रोसीड् इन रीडिंग !

वामनः—ओ आय सी ! " हिंदुस्तानांत कांहीं जहाल व मवाळ असे पक्ष असून त्यांच्यांत मतभेद आहे असें लोक बोलतात, पण माझेंमतें दोन्हीही पक्ष राष्ट्रहिताच्या दृष्टीनें एकच असून, आपल्या सार्वभौम राजानें देऊं केलेलें आम्रफल चिरून खावें कां पिळून खावें, एवढ्याच वादांत आहेत ! आमच्या दोन्हीही पक्षांची राजानिष्ठा पाहून, द्रव्यबल, मनुष्यबल, राजकारणांस लावण्याची आमची आतुरता पाहून, रणांगणांत स्वामिकार्यास्तव राक्षसी जर्मनांच्या तीक्ष्ण धारेस बळी पडलेल्या आमच्यांतील वीरांच्या अनाथ बायका-पोरांचा कळवळा येऊन आमचा दयाळु राजा ब्रिटिश-साम्राज्याखालींच आम्हांला आमच्या उन्नतीचें आणि राष्ट्रीय सुराज्याचें आम्रफल सुप्रसन्न होऊन देईल, यांत तिळमात्र शंका नाहीं ! समेट, ऐक्य, एकोपा व सहानुभूति, वगैरे शब्द जसें बाहिरंगी कर्णमधुर आहेत, तसेंच अंतरंगीही रस मधुरच आहेत. तेव्हां दोन्हीही पक्षांनीं आपआपले मतभेद बदलून तसेंच कर्तव्याचे मार्ग, त्यांची वाढ व आकार तांबड्याभोपळ्यासारखे, मारिशस-उसासारखे भिन्न न करतां

एकाच ठिकाणीं लॉंग अँड शार्ट आफ इट करावें ! " ( येवढें बोलून मी खालीं बसतों. ) अग, पण हे येवढें बोलून मी खालीं बसतों ! ही कंसांतली नकल पाठ करायची ना !

इंदिराः—इश्श बाई हें काय विचारायचें ! भाषण संपलें म्हणजे तिथें नुसतें उभें कोण राहूं देईल ! बसायलाच हवें !

वामनः—हो बरें झालें सांगून ठेवलेंस ! नाहीं तर माझें " शिवाजी कंसांत तरवार उपसतो. " असें व्हायचें ! वेल, पण माझ्या कॉमप्रमाईजच्या प्रपोझला तूं सेकंड करणार आहेस ना ?

इंदिराः—हो, हो ! कोणत्याही फेअर डिलिंगज् व आनेस्ट प्रिन्सिपलसच्या मनुष्याला कॉमप्रमाईज आवडलेंच पाहिजे. आपण तें प्रपोझल पुट अप केलेंत कीं, मी एकटीच काय पण आम्ही सगळ्याजणी सेकंड करूं!

वामनः—ओ स्प्लेंडिड देन ! पण बोललेली गोष्ट कृतींत आणण्याची वेळ आल्यास मनुष्यानें पुढें सरसावलें पाहिजे ? आज मी बरेच दिवस तुझ्याशीं कॉम्प्रमाईजचें प्रपोजल करीत असतां, त्याला तुझा कन्सेंट का बरें मिळूं नये ? मग असा कृतींत आणि बोलण्यांतच विरोध तुला कसा आवडतो ? इंदिरे ! सौंदर्य व विद्वत्ता यांच्या संमेलनांत ट्रेचरी, विश्वासघात किंवा कपट याला थाराच नसतो, असें असतां तूं माझ्याशीं कपट कां बरें करतेस ? तुझें सौंदर्य तर इतकें चार्मिंग आहे कीं तुला डोळे भरून पाहातांच मी तृप्त होऊन आनंदांत पोहूं लागतों. खरेंच—

पद—( सखि आज नंदनंद )

आनंदि आनंदिं मन होइ मम दंग ॥ रोमांचही येति मम
देहिं पाहीं ॥ ध्रु० ॥ नाना तरंगीं मन भ्रांत होई ॥ जें
पाहूं तें तें तव रूप घेई ॥ १ ॥

मग काय ! माझें प्रपोझल तूं सिरियसली मनावर घेणार ना ?

इंदिराः—आलेग बाई, पाहिले पाडे पंचावन ! वेल मिस्टर वामनराव, ह्या अशा गर्दीच्या वेळेस कशाला हें डिस्कशन हवें ? पुढें केव्हां तरी याचा विचार करूं या. शिवाय इतर वरकड गोष्टींकडे तर आपल्या सार-

स्त्र्यांनीं मुळींच लक्ष्य देऊं नये ! एक प्रेम असलें म्हणजे झालें ! प्रेम मुख्य आहे ! प्रेम हा राजा ! असेंच कां म्हणानांत ?

**वामनः**-तूं म्हणतेस हें खरें, पण तुझ्या या चार्मिंग ब्युटीकडे पाहिलें म्हणजे कॉम्प्रोमाईजचा प्रश्न वाटेल तिथें वाटेल त्या वेळीं मला काढावासाच वाटतो, हा तुझा असा भालप्रदेश पाहिला कीं मला फार वाईट वाटतें ! इंदिरे, निरनिराळ्या सबजेक्ट कमिटींतून निवडून आलेल्या ह्या हात, पाय, कंबर, नाक, गाल, व दंत, वगैरे स्वीट आणि मेसमराईजिंग डेलीगेटसच्या कॉनफरन्सला आरक्त असा कुंकुमतिलक प्रेसिडेंट, आपल्या गोंदलेल्या चेअरवर विराजमान व्हायला नको कां ? हे सर्व डेलिगेट इतके बांधेसूद मोहक असून, आपआपले ठराव, मुद्देसूत रीतीनें पुढें आणायला कसे आतुर झालेले दिसतात ! असें असतांना प्रेसिडेन्टच्या इलेक्शनमध्येंच कां बरें विलंब व्हावा ? तुझ्या हृदयांतील रिसेप्शन कमिटींत असा गोंधळ कां ?

**इंदिराः**–हें पहा, मीं जरा थोडी भीड सोडून बोलतें याची क्षमा करा. आमची घटना, आमचीं मतें, आमचें क्रीड, ज्याला पसंत असेल असाच प्रेसिडेंट निवडला पाहिजे ! ह्या सर्व डेलीगेटांची सभा त्याच्या ताब्यांत देण्यापूर्वीं त्याचा सर्व खुलासा झाला पाहिजे ! त्याच्या मताबद्दल, ध्येयांबद्दल सर्व चंवकशी प्रथम केली पाहिजे. मग रुकार !

**वामनः**–त्याचा सर्व खुलासा आत्तां करतों. हें पहा, तूं जहाल असलीस तर तुझी–स्वदेशी, स्वराज्य, बायकॉट, आणि नॅशनल एजुकेशन हीं सर्व मला कबूल आहे. माझी इंदिरा हेंच माझें स्वराज्य ! तूं सांगशील तेवढें खाणें, तूं देशील तें वापरणें हीच माझी स्वदेशी ! तुझ्याशिवाय इतर स्त्रीकडे न पाहणें हाच माझा बायकॉट ! तुला शृंगारणें, तुला खुलवणें हेंच माझें नॅशनल एजुकेशन ! आतां तर झालेंना ? फार काय सांगूं, इंदिरे ! माझा नित्याचा वर्तनक्रम देखील बदलून टाकतों ! “ लाडके ” माझा रसरशीत जहालपणा सर्वांच्या प्रत्ययाला आणतों. आजपासून शिविगाळीशिवाय तोंडांतून एक शब्दही काढणार नाहीं ! रस्त्यांतून जरी चाललों, तरी खालीं मुंडी घालून सर्वांकडे एखाद्या मारक्या म्हशीसारखा पाहात जाईन ! मिरें, मोहऱ्या, लवंग, आणि हिंग ह्या शिवाय अन्नकणही

तोंडांत घालणार नाहीं ! तुझें निष्कंटक निर्भेळ स्वराज्य प्राप्त झाल्याखेरीज इंदिरे ! ह्या हंथरुणावर आडवाही होणार नाहीं ! इतकेंच नव्हे तर जी गोष्ट रसरशीत जहाल अशा लोकमान्य लोकनायकालाही अशक्य ती गोष्ट मी केवळ तुझ्याकरितां जन्मसिद्ध असल्यासारखी करून दाखवीन ! लाडके, तूं नुसती आज्ञा कर ? माझा रसरशीत जहालपणा सिद्ध करण्याकरितां ह्या ठिकाणीं तुझ्या समोर अर्धाशेर सुंठ चावून टाकतों !

**इंदिराः**--( अगबाई हा माझे कपाळाचें कातडेंच काढणारा दिसतो. )

**वामनः**—हेंहि प्रपोजल तुला आवडत नाहीं वाटतें. तर मग तुझी मतें मॉडरेट मवाळ असतील, तर तेंहि मला कबूल आहे मग झालेंना ? इंदिरे, तूं जर मवाळ असशील तर मीहि जन्मसिद्ध मिळमिळित मवाळ होतों. लाडके, आजपासून आंबट तिखट सर्व वर्ज करून नुसता दुधभात भेंड्यांची भाजी खात जाईन. रस्त्यांत कोणी कां भेटेना तुझ्याकरितां ही अशी बावळी मुद्रा धारण करून; दोन लाथा मारल्या तरी त्याच्या समोर लोटांगण घातल्याशिवाय सोडणार नाहीं ! शेवरीच्या मखमली गाद्यागिर्द्या शिवाय हंतरुणास पाठ देखील लावणार नाहीं. तोंडांतून पुल्लिंगी शब्द न काढतां केवळ—लीला, विमल, कुसुम, मधुकर, विहंग असेच आपले मऊमऊ शब्द उच्चारित जाईन ! इंदिरे, खरोखर यापेक्षां तुझ्यावर आणखी जास्त कसें प्रेम करावें, तें मुळींच मला कळत नाहीं.

**पद**—( चूनरिया मैका लाल रंगा दे. )

नच जाणें केवीं मी प्रेमालागीं करावें ॥ आश्रु येति नयना
पहा ! नैराश्यें बैसावें ॥ ध्रु० ॥ प्रेम हेंचि काय वदगे ?
मजला न ठावे ॥ १ ॥ फाटो हृदयिं अनुदिनिं कवळुनी ॥
चुंबचुंब वदना चुंबावें ॥ २ ॥

इंदिरे, माझें मन कसें पाऱ्यासारखें निर्मळ आहे. मी मताच्या हीटला उष्णतेला किंवा मतांच्या शैथिल्याला मान तुकविण्यास निरंतर तत्पर असतों.

**इंदिराः**—ठीक आहे ! लवकरच याचा आपण उभयतां विचार करूं !

आपण चला गडे ! आतां वेळ झालीच तिकडे ! खरेंच बाई आपण चला गडे ! तिकडे मांडवांत आपली वाट पाहात असतील ! चला ! आपण याचा लवकरच सीरियसली विचार करूं !

**वामनः**–इतकें आश्वासन मला पुरें आहे. बरें तर मी जातों पुढें, तुम्हीं याव मागोमाग ! ( जातो. )

**इंदिराः**–( काय करूं, यांना पाहिलें म्हणजे आताशां माझ्या मनांत दयाच उत्पन्न होते. ) अग; चला कीग सगळ्याजणीं लवकर ! ( सर्वजणी प्रवेश करतात. ) कायग दामिनी ! इतका का उशीर लागला तुम्हांला यायला. कसें काय ? चंपाबाई, राधाबाई ? अशी मौज तुमच्या सातारला नसेल पाहायला !

**राधाः**—छे, असे कुठले समारंभ आमच्या सातारला ! अजून तिकडे उजाडलेंच नाहीं !

**ताराः**—पण बाई आमच्या पुण्यास नित्याचा हाच धुडगुस आहे ! उन्हाळयांत व्याख्यानांचा पूर नदीला जाऊन मिळतो म्हणून तिकडे लकडीपूल देखील वाढवणार आहेत म्हणे !

**यमुनाः**–पुरे बाई, तुला अगदीं थट्टा करायला नकोच !

**इंदिराः**–इश्श ! काय ग दामिनी आज सभेला जायचें म्हणून असलें मुद्दाम झिरझिरीत कातणीच्या घरासारखें पातळ नेसलीस वाटतें ? काय मेलं, सोंग तरी हें !

**दामिनीः**—सोंग कसलें आलें आहे यांत ? मानापमानांत भामिनी पहारा करते ना पातळ नेसून ? त्याच ठाणांतलें आहे हो हें !

**ताराः**—बरीच कोंग आहेस ! असें असें. त्यांतलें थोडेसें आणखी कापड राखून ठेव हो ! म्हणजे लग्न झाल्यावर तिकडे नेसायला धोतरें होतील ! काय ग; आपण जाणार आहोंत त्या सभेंत कोणी धैर्यधर आहेत असें का तुला वाटतें ? तसें मुळींच नाहीं हो ! सगळे लक्ष्मीधरजीच आहेत !

**यमुनाः**–नाहीं हो दामिनीबाई, तुम्ही कशाला ह्यांचें बोलणें मनावर घेतां ! ह्यांना नेहमीं दुसऱ्याची थट्टा करावयाची संवयच आहे. नटलें मुरडलें कीं लागलें भामिनी म्हणायला ! झिंजा सोडून अवतार घेतला

कीं झालीच ती देवयानी ! हें जग आहे ! नांव ठेविल्याशिवाय कोणची गोष्ट आहे कां ? छे ! किती सुरेख हा सभेचा पोषाख आहे तुमचा ! दृष्ट लागेल बाई ! खरेंच—

पद—( देखुंगी प्यारे )

शोभवी किति रूपासि बुचडा ॥ सुबक सुघडा, स्कंधिं लोळे अंबाडा ग ॥ ध्रु० ॥ मोरणि नाकीं पदर असा कीं ॥ ठेविला ग किंचित उघडा ॥ १ ॥ अंगुलि कंधर भृकुटि भंगे ॥ बैसवीशिल सभेंत पगडा ॥ २ ॥ जन मन हरशिल लाजुनि पुसतां ॥ हातरुमालें मुखडा छबुकडा ॥ ३ ॥

दामिनीः—चल ! मोठी आली आहे कैवार घ्यायला माझा !

इंदिराः—दामिनी तूं कांहीं म्हण पण खरेंच गडे तुझ्याकडे पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, जसा कांहीं सभेंत आज मोहिनी अवतारच प्रगट होणार आहे !

पद—( आवो आलबेला )

नटवोनि काया ॥ सजली निघाया ॥ नरमद हराया ॥ ध्रु० ॥ शृंगारललना ॥ शशितेजवदना ॥ प्रगटे भुवनिं मोहाया ॥ १ ॥

दामिनी—चला, तुम्ही काय कमी नटलां आहांत ! माझ्यापेक्षां कांकणभर जास्त ! मला नको नांव ठेवायला.



# अंक चौथा.



## प्रवेश १ ला.

——:o:——

**सीन**–( रस्ता–शंकरराव, गोपाळराव, केशवराव, व गोविंदराव. )

**शंकरः**–काय म्हणतोस, आजच्या आज सर्व आटपणार ? आणि रजिस्टर ऑफिसांतच लग्न ! पण इतक्या गर्दीनें कां ? काय म्हणतोस, आजच्या आज ?

**गोपाळः**—अहो ! तिच्यावर आहेत बऱ्याच जणांचे–तसें कशाला, केशवरावांचा डोळा आहे, तुमचा आहे ( माझा देखील आहे. पण आपल्याला मिळणें जरा कठीण आहे. ) एकंदरींत लवकरच आपलें उरकलेलें ठीक, असें तिच्या बापाला वाटणें सहाजिक आहे. आतां, आहे खरा प्रसंग आणीबाणीचा !

**शंकरः**–मग आमचें सर्व आख्यान आटपलेंच म्हणायचें ! कायरे गोपाळ, तुला नाहीं कां सुचत कांहीं अजून ?

**गोपाळः**–थांबा; हे पहा आपण गोविंदरावाच्याच घराजवळ आलों. मी करतों पुन्हां प्रयत्न पण शब्द नको तुमचा आतां.

**शंकरः**—जा गाढवा नाहीं तर ! ( ह्याला अगदीं मान आला आहे. मीच काम करतों. ) जातोंरे मी बाबा ! कंटाळा आला तुझ्या मनघरणीचा ! ( जातो. )

**गोपाळः**—हो, आतां असेंच केलें पाहिजे. धांवा, धांवा ! मेलों ! मेलों ! अग आई ! अरें धांवा ! खून ! खून ! मेलों !

**केशवः**—( केशवराव व गोविंदराव धांवत येतात. ) कायरे, काय झालें ? असा लोळतोस कां ?

**गोपाळः**–आमच्या शंकररावाचें आणि माझें भांडण झालें. नोकरीवरून काढून टाकून मला मरे मरेतों मारलें. हाय ! आईग !

**गोविंदः**—तो मनुष्य अगदींच मूर्ख दिसतो बोवा ! थांब; अरे पण भांडण कसलें नि मारलें कां इतकें ?

**गोपाळः**—अहो ! अग आई ! त्याला रेसीसमध्यें पैसे उधळूं नका, थुंकतील चार लोक तोंडावर तुमच्या असें म्हणालों म्हणून मारलें ! जगांत कुणीच सत्याचा वाली नाहीं हो ! अग आई ! त्याची अगदीं इमानें इतबारें नोकरी केली हो ! अग आई, आईग ?

**गोविंदः**—अरेरे ! तो फारच चमत्कारिक दिसतो बोवा ! उपदेश केला म्हणून मारलें तुला ? चमत्कार !

**गोपाळः**—होय हो ! कसेंहि करून तुमची राधाबाई मला मिळवून दे म्हणून सारखा माझ्या मागें लागला होता.

**गोविंदः**—( त्यांचा पत्रव्यवहार झाला म्हणून केशवराव म्हणत होता खरेंच ! )

**केशवः**—( हा देखील शंकररावांकरितां प्रयत्न करीत होता खरेंच. )

**गोपाळः**—अग आई. मी सारखा नको, नको म्हणालों. मी नाहीं त्या भानगडींत पडत असें म्हणालों म्हणून मारलें. आई ! त्या राधाबाई जर मला भेटल्या तर आतां त्यांना साफ सांगेन ह्या शंकररावाचे धिंडवडे ह्याचा सूड उगवायाकरतां त्यांना साफ सांगेन कीं, केशवरावाबरोबर सुखानें संसार करून चांगले म्हातारे म्हातारी व्हा !

**गोविंदः**—त्या मूर्खावरील तिचें मन वळवायला हा आपल्याला आतां चांगला उपयोगी पडेल.

**केशवः**—(याला एक वेळ ठेंच लागली आहे. तेव्हां हा प्रथम आपलासा करून घ्यावा. ह्याला घरीं ठेवला म्हणजे ठीक जुळेल.) कायरे, तूं आमच्या जवळ चाकरीला राहतोस कां ?

**गोपाळः**—मोठ्या आनंदानें राहतों. मला त्या शंकररावाचा सूड घेतलाच पाहिजे !

**गोविंदः**—ठीक आहे, तूं आमच्या घरींच ऐस; जा; केशवराव, तुम्हीं सर्व तयारीला लागा.

**केशवः**—ठीक आहे उद्यां सर्व आयुष्याचा निकाल आहे. कोर्टाचा निकाल तसाच लग्नाचाहि निकाल. ( जातो. )

**नोकरः**—इथें कोणीं गोविंदराव सातारकर आहेत का ? त्यांना हें पत्र द्यायचें आहे. ( देतो व जातो.)

**गोविंदः**—आण इकडे. ठीक आहे! गोपाळा, आजपासून तूं आमचा नोकर झालास ! ( पत्र वाचतो ) " साष्टांग नमस्कार. वि. वि. उदईक तुमच्या मुलीचें लग्न रजिष्टर होणार असें ऐकतों. टाळल्यास फार बरें. कांहीं बहुरुपी सोदे वाटेल तसा कांगाव करून तुमची मुलगी पळवून नेतीलच. आपण नेमस्त केलेला वर थोडा व्यंग आणि अधू आहे; डाक्तरकडून चांगला तपासावा " काय हलकट मनुष्य आहे हा !

**गोपाळः**–( शंकाच नको ! शंकाच नको ! हें निः संशय आमच्या बैलाचेंच काम ! )

**गोविंदः**–( पत्र वाचतांच हा का बरें पुटपुटूं लागला ! हो, चर्या देखील बदलली. संशयच नको ! पक्का बहुरूपी. ) कांरे, आहे वाटतें कांहीं डाव साधायचा इथें ? चल, चालता हो ! तुझ्या नोकरीची मला मुळींच जरूर नाहीं. ( हा भामट्या नसेल कशावरून ! आणि मी तरी संशयाला जागा कशाला ठेवूं. बस्स, तें कांहीं नाहीं, चार दिवस लग्नाचा बेत राहितच केला पाहिजे ! इथले हे कुटाळ लोक काय करतील नेम नाहीं. या बाबतींत काय करणें तें सुंदराबाईच्या सल्ल्यानेंच केलें पाहिजे.) चल हो चालता ! ( जातो. )

**गोपाळः**–शंकाच नको ! ह्याच गाढवाचें तें काम ! हा पहा आलाच गाढव तिकडून हंसत हंसत !

**शंकरः**–( मोठ्यानदा हंसत प्रवेश करतो. ) अरे गोपाळा ! (हंसतो) गोपाळा ! ( हंसतो ) गोपाळा ! ( हंसतो )

**गोपाळः**–अहो पण, रडा कीं काय म्हणतां तें ! नुसतें ह-ह-हनें काय समजूं ?

**शंकरः**—अरे त्या थेरड्याला असा तोंडघशीं पाडला, कीं यंवरे यंव् ! तुला देखील मीं जर केलेली युक्ति सांगितली, तर तूं आज माझी खात्रीनें पाठच थोपटशील ! उगीच नाहीं इतक्या पदव्यांचे भारे बांधले ! ऐक. त्यांचें लग्न होणार म्हणून तूं मला सांगतांच घरीं जाऊन असें एक निनांवी खरपूस पत्र म्हाताऱ्याला घसडलें कीं, धडकीच भरावी त्या थेर-

ड्याला ! तें पत्र त्याच्या हातीं पडून काय गंमत होते ती पहायला लागलींच इकडे आलों; तों थेरडा आत्तां रागारागानें चरफडत तिकडे जातांना मीं पाहिला; यावरून बहुतेक काम फत्ते झालेंच असलें पाहिजे. चल दे टाळी ! तें कांहीं नाहीं, या वेळेस तूं टाळी दिलीच पाहिजे.

**गोपाळः**—वाजवा आतां टाळ्या तुम्हीच ! तुमचें माझें भांडण झालें म्हणून चांगला त्यांच्या घरांत नोकरीला राहिलों होतों आणि दोन दिवसांतच सगळें काम चंपेच्या सल्ल्यानें साधणार होतों, पण तुमचे पत्रानें म्हाताऱ्याला माझा संशय येऊन माझें सर्व कारस्थान फिसकटून टाकलें ! झालें आतां ! छान केलें ! ( नमस्कार करतो )

**शंकरः**—अर्र्र्, मग भलतेंच झालें तर ! ( गांगरून उभा राहतो. )

**गोपाळः**—थांबा असेच कांहीं वेळ. मी फोटोग्राफरला बोलावतों. असला सुंदर चेहरा नाहीं यायचा पुन्हां तुम्हांला करायला. आपला आठवणीचा एक फोटो काढलेला असावा !

---

# प्रवेश २ रा.

—:०:—

**सीनः**—( रस्ता—गणू संगित्या व चहावाला प्रवेश करतो. )

**गणुः**—आज पंधरा दिवस झाले सगळी कंबर सोलून निघाली आहे ! हे हाताचे असे खेकडे झाले आहेत. रात्रंदिवस हे पोपट असे उराशीं बाळगतों ! केव्हां केव्हां तर रात्र रात्र जागरण करावें लागतें !

**चहा०ः**—असें झालें तरी काय तुला ?

**गणुः**—लेका व्हायचें राहिलें काय आणखी ? खरजेनें आणि गजकर्णानें तळव्यापासून टाळक्यापर्यंत कसा पारिजातकासारखा फुललों आहें ! मला वाटतें तुझ्या दुकानांतलें तें विहिणीचें अंबोण खाऊनच मला खरूज झाली !

**चहा०ः**—अंबोण ?

गणूः—हो--हो--अंबोण ! तुझी ती मिसळ आणि अंबोण एकच. ही मिसळ दुकानांतून सुरू झाल्यापासून खरेंच सांग शपथ वाहून, मूठभर तरी खरकटें बाहेर टाकतोस का ?

चहा०:—अरे, मोठ्यानदा बोलूं नकोस ! चालायचेंच हें ! गवळी जसा दुधाऐवजीं पाण्याचा पैसा वसूल करतात तसाच आम्हीं सडकें, कुजकें, नासकें, डेंख, शिळें आणि खरकटें गुंजभर वाया जाऊं देत नाहीं ! कोणी इन्स्पेक्टर तपासायला आला, कीं एक पेलाभर मसाल्याचें दूध त्याला प्रथम कीं—

गणूः—लागलींच सारा, खुपरी, वडस, फुलें पडलींच त्याच्या डोळ्यांत ! अर् र् र् ! थोडी पाठ खाजीव बोवा ! फारच कंड सुटली ! कांहीं एक सुचत नाहीं. अहाहा ! देव तुला चार डझन मुली देवो ! अहाहा ! स्वर्ग-सुख यापुढें काय माल आहे—

पद—( नये जोबन )

गजकर्ण खाजवितां मजा आला ॥ ध्रु० ॥ चोळुनि चोळुनि
लागे समाधी ॥ योगि जसा कीं तपा बसला ॥ १ ॥

मला वाटतें, हे साधुसंत जे समाधि लावायला शिकले त्यांना प्रथम सडकून खरूज असली पाहिजे. त्याशिवाय त्यांच्या चित्ताची इतकी एकतानता झालीच नसती !

चहा०:—कायरे, तुझी पत्रिका आहे का ? मला पाहायचें आहें तुझें जन्मनक्षत्र. बाकी आहेसच तूं नक्षत्र म्हणा. लेका ! इतके हाल सोसतोस. त्यापेक्षां जी. जी. ब्रदर्सचें मलम फास! कायरे, हा संगिताचा घुडगूस कुठें घालायला शिकलास !

गणूः—अरे, आमच्या क्लबांत रात्रंदिवस पोरीचें, पोरी कसल्या म्हणा जाऊं द्या आपण कशाला लोकांच्या आया-बहिणींवर टीका करा—हें पहा, रात्रंदिवस तिथें पेटी, तबला, नि गाणें झडत असतें; म्हणून रात्रीं कसा तरी वेळ जातो. त्यांचीं गाणीं ऐकून मला चटक लागली. आणि रात्रंदिवस मनाशीं गुणगुणतां गुणगुणतां वेड्या सहजासहजीं माझ्या मनां-

तल्या गोष्टीवर देखील पदें जुळवावयाची हातोटी साधली. अररर. पुन्हां मजा आला वाटतें !

चहा०:—अरे लेका गण्या ! तूं जर इतका पीडला आहेस, तर चार दिवस रजा कां घेईनास ? तुझी आई आहेना ? चार दिवस देईनास कां तिला तुझ्याबदली ?

गणूः—तुला काय अचरटाला, उचलली जीभ लावली टाळ्याला ! माझें मला ठाऊक काय आहे तें ! शिवाय माझी आई काय लेका मोकाट सोडली आहे गांवांत भटकायला ? बेट्या ऐक—

पद—( माता दिसली समरीं )

माता बसली स्वगृहीं रखडत, घासित ताट तव्यासि पळ्यांसि ॥ ध्रु० ॥ गोमय गोळा घेउनि हातीं, लिंपित वैलचुलीशीं ॥ १ ॥ अंगडिं चोळ्या कुंच्या दुपटीं, लुगडिंहि नेत नदीसी धुण्यासी ॥ २ ॥

आलेंना तुझ्या लक्षांत, काय म्हणालों तें ?

चहा०:—धन्य बाबा तुझी !

गणूः—शिवाय लेका माझ्या क्लबांतले पोटभेद माझे मलाच ठाऊक ! माझी आई आहे फटकळ सगळ्या मुलखाची. इथले कांहीं प्रकार तिनें पाहिलेन तर सगळ्या गांवांत डांगोरा पिटीत सुटायची, आणि माझी गरिबाची नोकरी सुटायची. चल जाऊं लवकर !

चहा०:—कुठें निघाला होतास इतक्या लगीनघाईनें, सांग तर खरें !

गणूः—हेंच तें ! तुला चांभारचवकशी करायची संवयच. आतां तूं माझा जिवलग स्नेही म्हणून सांगतों बरें ! बाहेर कुठें फोडशील तर माझी गरिबाची नोकरीची गांठ आंवळायची ! आज सहा महिने झाले, क्लबां-तली एक मेंबर तुंगाबाई दिवसेंदिवस लठ्ठ व्हायला लागली होती म्ह-णून गेली बापाकडे महाडला, त्यानें पुन्हां लाथ मारून घालवून दिली परत !

चहा०:—अरे वा ! ती तर आज दोन वर्षं इथेंच शिकत होती ना ?

**गणूः**—अरे कसलें शिकणें घेऊन बसलास ? तो विद्याधर मास्तर कसला वस्ताद ! शिकवणी लांबवावी म्हणून नुसता दोन वर्षे गुणाकार-भागाकारच शिकवीत होता !

**चहा०ः**—असें काय ? बरें, पण तिला पुन्हा परत कशाला पाठविली तें नाहीं समजलें.

**गणूः**—हा लेका ठोंब्या ! अरे, पुन्हा रोड व्हायला ! आणि म्हणून तर निघालों होतों त्या डाक्तरला आणि दामिनी सुइणीला बोलवायला ! आतां नाहीं मला वेळ इथें उभें रहायला ! चल जाऊं डाक्तरच्या घरापर्यंत बोलत बोलत. मी देखील थोडें मलम घेऊन येतों.

**चहा०ः**—डाक्तरचें घर कुठें आहे ?

**गणूः**—सुइणीच्या जवळ !

**चहा०ः**—सुइणीचें घर कुठें आहे ?

**गणूः**—अरे डाक्तरच्याजवळ !

**चहा०ः**—अरे, पण दोघांचीं कुठें आहेत ?

**गणूः**—अरे जवळ जवळ ! प्रश्न विचारून कीस काढायची भारी संवयच दिसते तुला ! हं चल लवकर, नमनावारींच तेल जळालें सगळें ! चल !

**चहा०ः**—मला दुकानांत जायला होईल उशीर. अरे, पण कोणच्या पेठेंत आहे तें तर सांग ?

**गणूः**—घाबरें केलें लेकानें प्रश्न विचारून विचारून ! ऐक, आतां मात्र—

पद—( हमसे न बोलो राजा )

नाहीं मी मारिन आतां ॥ नाहीं मी मारिन लाथा ॥ झाडिन संगित लाथा ॥ विनयहीन वदतां आतां ॥ ध्रु० ॥
वचप्रचुरा रीती ना शोभे गद्यांतीं ॥ काव्यमया भू आतां ॥ १ ॥

आलें लक्ष्यांत तुझ्या ? चल हो मुकाट्यानें पुढें !

**चहा०ः**—तुझ्या ह्या संगीत धूमधडाक्यानें मी तर अगदीं थक्क झालों!

ज्या ह्या काव्योन्मादाला सर्व इकडचे तिकडचे लोक रस्त्यावर उभे राहून पोट धरून हंसताहेत !

गणूः—चालायचेंच, त्यांत काय आहे ! जग हें आधीं एक मोठा वेड्याचा बाजार आहे. एका वेड्याला दुसऱ्या वेडा हंसला म्हणून त्यांत राग कशाला ! ते पहा, कांहीं हंसताहेत, कांहीं टाळ्या पिटताहेत, कांहीं वन्स-मोर, वहिनी लांडोर म्हणताहेत. मी म्हणतों तें खरेंना ? पहा कसे चौफेर हंसताहेत ! सगळ्या प्रकारचे मासलेवाईक वेडे आहेत बरें का हे !

चहा०:—आहे खरेंच ! पण यांत तुझें नि माझें वेड नाहीं सांगितलेंस ?

गणूः—अरे बेट्या, तुझें वेड तर सुप्रसिद्धच आहे.

चहा०:—तें कसें काय ?

गणूः—लोकांना खरकटें खायला घालून पैसे उकळायचें ! कायरे, लग्नसराईत तुझ्या मिसळीला पूर येत असेल नाहीं ? इतके हरामाचे पैसे मिळवायचे !

चहा०:—हें पहा, हात जोडतों ! माझ्या दुकानदारीवर पाणी आणूं नकोस. माझें वेड समजलें, तुझें सांग. संगीत लाथा झाडीत गांवांत हिंडायचें हेंच ना ?

गणूः—नाहीं ! सपशेल चुकलास ! मला वेड आहे झोपेचें ! हिंडायला वेळ कुठें आहे ! आमच्या क्लबांत आठ वाजले कीं, उखळापाशीं—

पद—( नोहे हा पवन जवन )

सज्ज करुनि गादि उशी वरति पहुडतों ॥ पासोडिची
करुनि घडी पायिं ठेवितों ॥ध्रु० ॥ ढेकुण मग येति पहा ॥
पिसवाही चपल महा ॥ रुणझुणती चिलट पहा ॥ मी बळि
जणु त्या समुहा ॥ मधुनि मधुनि उंदिरही पाय तोडितो ॥१॥

असें माझें वेड आहे. कायरे तूं मोठा भोळा दिसतोस ? इकडे ये पाहूं. ( त्याचा कान धरतो ) अरे चोरा, विषय बदलून उभा केलास काय ?

चल पुढें. डाक्तरच्या घरापर्यंत नेल्याशिवाय तुझ्या बापाला सोडणार नाहीं चल हो पुढें ! ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.



सीन—( इंदिरेची शृंगारलेली खोली. )

इंदिराः--रात्रंदिवस ह्या संगीत सुंदराबाईंचा त्रास तरी किती सहन करायचा ? पैसे मिळवायचें खरे, पण किती मिळवायचे आणि कसे मिळवायचे याला कांहीं तरी ताळतंत्र आहेना ! बरें, मिळविले तरी करायचे काय इतके ? थीयेटर बिल्डिंगफंड म्हणें ! करायचें काय तें थियेटर, जाळायचें आहे ! मी साफ सांगतें आज ह्या सुंदराबाईला कीं, तुम्ही या नादीं अगदीं लागूं नका. मी साफ सांगणार, काय वाटेल तें होवो ! कोण ग बाई हा मेला त्रास ! आतां हेंच पहानात ! त्या मेल्या त्रिंबकशास्त्राची नुकती बायको मेली, आणि त्यानें माझ्याशीं पुनर्विवाहाबद्दल आमच्या संगीत सुंदराबाईपाशीं गोष्ट काढली. तिकडे काय आधींच उल्हास ! लागलीच त्यांनीं त्याची माझ्याकडे रवानगी केली. मला बजावून सांगितलें कीं, त्याच्याशीं लाडी गोडी करून सर्व घरादारांचा आपलें नांवे आधीं कागद पत्र करून घे. मला नको बाई, ह्या अशा रीतीनें कोणाची घरें नि दारें ! तें मेलें त्रिंबकशास्त्रांचें माकड मला पाहायला घरीं बोलावणार होतें ! अरे मेल्या ! जात असतील कुणी अजागळ, घरोवरीं मुली घेऊन दाखवायला ! पण आय् ॲम् क्काइट अगेन्स्ट इट् ! असली गरज तर ये घरीं !

गणूः—इंदिराबाई ! बाहेर त्रिंबकशास्त्री आपल्या भेटीला आले आहेत ! आपण सांगाल तर आंत घेऊन येतों !

इंदिराः—त्यांना साफ जाऊन बजावून सांग, माझ्या खोलींत पाय ठेवतांच मी सांगेन तसें मुकाट्यानें वागलें पाहिजे. विचारलेल्या प्रश्नाखेरीज एक शब्दही जास्त काढतां कामा नये. ह्या जर सगळ्या अटी त्यांना मान्य असतील तरच खोलींत पाय ठेवायचा. जा त्यांना आधीं विचारून ये. ( गणू जातो व परत येतो. )

गणूः—त्यांना सगळ्या अटी मान्य आहेत असें म्हणताहेत ! साष्टांग नमस्कार घालीत या, म्हणून जरी म्हणत असाल तरी, घरीं परत जाऊन तिथूनच रस्त्यांतून नमस्कार घालीत येतों म्हणताहेत !

इंदिराः—ठीक आहे—जा—त्यांना आंत घेऊन ये ! आणि जर का त्यांनीं उर्मटपणा केला तर तूं इथेंच जवळ उभा रहा.

गणूः—ठीक आहे ! ( आज होतो चांगला पुनर्विवाह लेकाचा इथे ! ) ( जातो. )

इंदिराः—काय ग बाई मेल्यांच्या काहार तरी, उठला सुटला लागला पुनर्विवाह करायला ! सुधारक नाचायला लागले कीं, लागलीं हीं मेलीं दिवाभीतें नाचायला ! आज या त्रिंबशास्त्राची अशी खोड मोडतें कीं, मेल्याला आठवणच राहिली पाहिजे ! मेला मला, पहायला घरीं आपल्या बोलावित होता !

( भस्म, गंध, चष्मा, आंगरखा, उपरणें, पगडी घालून त्रिंबकशास्त्री व गणू प्रवेश करतो. शास्त्रीबुवा पोथी घेऊन रार्कींग खुर्चीवर बसूं लागतो) अं, हंः असे पलीकडे लांब खालीं बसा.

गणूः—या—बसा असे इथे प्रशस्त ?

त्रिंबकः—अरे वा ? म्हणजे काय ?

गणूः—म्हणजे काय असायचें ! अहो शास्त्रीबोवा, पुनर्विवाह करायचा आहेना तुम्हांला ? बसा तर चांगले असे इथें प्रशस्त !

इंदिराः—इतकें नको काहीं अवघड वाटायला. पहायला आणलेल्या दुसऱ्यांच्या मुलींना बसवतांना कसें बरें वाटतें ?

गणूः—बसा, बसा, बसा लवकर !

त्रिंबकः—असें काय ? पुनर्विवाहाची सगळी रीत उलटी असते काय?

गणूः—तर तर, इथून तिथून सगळेंच उलटें असतें ! इतकीं अठरा पुराणें घोकून येवढें कां तुम्हांला समजेना ?

त्रिंबकः—बरें बसतों तर मग ! ( बसतो ) काय चालीरीतींत फरक असतो हो पहा ! छे ! न भूतो न भविष्यति ! अरे गणू ! कसेंहि करून जर येवढा आमचा पुनर्विवाह जुळवून देशील तर तुला एखादें चांगलेंसें भातखाचर बक्षीस देईन पहा !

गणूः–ठीक आहे ! अगदीं हूं कां चूं न करतां त्या सांगतील तसें करा. म्हणजे झालेंच काम फत्ते !

त्रिंबकः–ठीक आहे ! अरे, प्रसंगाविशेषीं चातुर्य देखील दाखवीन !

इंदिराः–आपलें नांव काय ? ( एकीकडे हंसते. )

त्रिंबकः–हं हं माझें नांव ? त्रिंबकशास्त्री !

इंदिराः–असें काय ? बरें घरच्या उत्पन्नाची स्थीति ?

त्रिंबकः–योग्य प्रश्न ! कोकणांत एक डोंगर आहे. फणसांचीं पंचवीस झाडें आहेत. तसेंच नारळी, पोफळी आणि केळी विपुल आहेत ! वीस खंडी भाताचें उत्पन्न असून सुखवस्तु स्थिति आहे.

गणूः–या सर्व घोळांत अळवाचें तर नांव नाहीं ?

त्रिंबकः–छेरे, असें कसें होईल ! अळू परसांत पुष्कळ आहे ! तसेंच अमसुलांचींहि झाडें असून रातंबेल काढीत असतों ! शिवाय इथें चार घरें असून दोन बखळी आहेत.

इंदिराः–असें काय ! बराच सरंजाम आहे ! बरें, भावंडें किती आहेत ?

त्रिंबकः—पाहिल्या कुटुंबाच्या चार मुली आहेत ! घरचा मी एकटाच आहे. चार इष्टमित्रांच्या आग्रहावरून सहज पुनर्विवाह करायचें योजिलें आहे. सिद्धीस नेणार पुळ्याचा श्रीगणपति समर्थ आहे !

इंदिराः—होय, होय. असें काय ? बरें शिक्षण कुठपर्यंत झालें आहे ?

त्रिंबकः—मराठी सहावी यत्ता शिकून अमरकोश, समासचक्र, पुरुषसूक्त, महारुद्र, लघुरुद्र तसेंच रघुवंश मुखोद्गत आहे. म्हणतों पाहिजे तर ! षोढा समासाः संक्षेपादष्टाविंशतिधा पुन्हा रामो हरिः करीन भूर्भुत— ( गणू त्यास थांबवतो. )

गणूः—अरर्रर्, अहो त्यांनीं तुम्हांला म्हणायला नाहीं सांगितलें ! अशानें सगळें फिसकटून जायचें पहा.

त्रिंबकः–असे का ? अरे मला काय ठाऊक ! बरें राहिलें, नाहीं म्हणत. माझा आग्रह थोडाच आहे !

इंदिराः—चष्मा शार्टसाइट म्हणून का लावलात ?

ंबकः----छे, छे ! दृष्टि अगदीं तीव्र आहे; वाचून दाखवितो पा- तर-( तो वाचूं लागतो व गणू थांबवितो ) पाहिजे तर काशिंद्याच्या न दोरा ओवून दाखवितों. चष्मा उगीच चार स्नेहीमंडळींनीं सांगि- वरून लावून आलों आहें झालें !

ाणूः-( पुनर्विवाहदेखील चार स्नेहीमंडळीच्या करतांच करतो वाटतें ाल. )

इंदिराः-असें काय ? शोभतो देखील चांगला आपल्याला ? बरें उठून रहा पाहूं, म्हणजे उंची कळेल !

त्रिंबकः-ठीक आहे. ( उभा राहतो ) सिद्धिविनायका, यश देणें ाकडे आहे !

इंदिराः-उंची योग्य आहे, शरीरप्रकृति सदृढ दिसतेच आहे !

त्रिंबकः—हो, हो ! यांत काय संशय ! नित्य सहस्र नमस्कार सूर्याला ीत असतों. ( हीच चातुर्य दाखाविण्याची वेळ आहे ) खरें आहे, हेजे तर सहज चार पावलें टाकून दोन उड्या मारून दाखिवतों ! : आहे, काय हरकत आहे !पायांची मजबुतीही कळेल

गणूः—शाबास, त्रिंबकराव ! कसें पण ठीक बोललात ! अशीं झो- त पावलें टाकून उड्या मारून दाखिवतां कीं, यंवूरे यंव् ! हीच परीक्षेची ठ आहे ! म्हणजे झालेंच काम तुमचें !

त्रिंबकः—( त्रिंबकराव चालून दाखिवतो व कंबरेस उपरणें बांधून देरेच्याकडे उड्या मारीत जातो. मध्येंच पोथी जवळ घेतो. )

गणूः—हां अरररर ! येवढा रघुवंश खाकेंत असूं द्या !

इंदिराः—गणू ! गणू ! ( कानांत सांगते. )

त्रिंबकः-( हे मंगलमूर्ते, पुळयाचे गणपते ! कार्यसिद्धि तुमच्याकडेच ाहे ! )

गणुः-ठीक आहे ! त्रिंबकराव, त्या उद्यां तुम्हांला स्वतः भेटणार आ- त, त्या वेळेसच सर्व हुंडा, मानपान, करणी व मुहूर्त वगैरे ठरवतील !

त्रिंबकः-असें का ? योग्य ! बरें तर, मी त्यांची आज्ञा घेतों. ( तिच्या जवळ जाऊन नमस्कार करतो ) आपण उद्यां अवश्य भेटणार ना ? आपण

सुशिक्षित श्रीमती आहांतच, तेव्हां जास्त विवरण नकोच ! आपली सहा-नुभूति—

**इंदिराः**—होय, होय ! गणू, यांना आधीं बाहेर नेऊन पोचीव पाहूं !

**गणूः**—हरकत नाहीं ! मारलीत खरी अखेरी ! प्रेमाच्या सहानुभूतीचा कालवा आलाच समजा आतां तुमच्या पाठोपाठ !

( गणू त्यास बाहेर पोंचवितो व परत येतो. )

**इंदिराः**—अरे मेल्या ! पुनर्विवाह करतें आहे मेलें माकड ! कायरे गेला का ?

**गणूः**—हो ! गेला ! घरीं देखील पोंचला असेल !

**इंदिराः**—आय थिंक वामनराव मस्ट हॅव कम गणू ! जा. वामनराव आले असतील तर त्यांना आंत घेऊन ये. ( जातो ) ह्या मेल्या अशा दिवाभीतांशीं जन्म कंठण्यापेक्षां माय डीअर वामनराव इज फॉर बेटर. रूप आहे, पैसा आहे, हौस आहे शरीरप्रकृति आहे, सर्व कांहीं आहे. आतां हें उपमांचें खूळ आहे म्हणा डोक्यांत त्यांच्या ! पण माझ्यावर असलेल्या त्यांच्या अकृत्रिम प्रेमाकरतां व सिन्सिआरिटीकरतां मी देखील थोडा सेल्फ सॅक्रिफाइस् केलाच पाहिजे. शिवाय या बाईच्या हॉरीबल स्कॅन्डल्स मधून सुटायला एकच मार्ग उरला आहे, आणि तो रीमॅरेज ! आधींच सगळें अशाश्वत त्यांतून मनुष्याचें आयुष्य म्हणजे पाण्यावरचा बुडबुडा ! त्यांतून लहानपण, म्हतारपण आणि झोंप वजा जातां सरासरी तीनचार वर्षें बाकी राहातात. साठीच्या आयुष्यांत तीस झोंपेंत गेलीं. राहिलेल्या तिसांत पंधरा वर्षें बालपण, व पंन्नाशीच्या पुढें दहा वर्षें रिकामपण, अशीं पंचवीस वजा जातां उरतात पांच वर्षें. त्यांच्यांत देखील माझीं कांहीं वर्षें हें असें झाल्यानें फुकट गेलीं. तेव्हां राहिलेलीं वर्षें, ही गोल्डन टाईम, ' तुला न मला, घाल कुत्र्याला ' असें करण्यांत काय अर्थ आहे ! तें कांहीं नाहीं.—

पद—(उचटगई निंदिया )

साधुनि घेइ घडी तरुणपणीं ॥ अनुकूल जोंवरि हें त्रयमान ॥ ध्रु० ॥ हे मनमोहन जाइल यौवन ॥ मग कोणि न

देतिल मान ॥ १ ॥ विगलित पंकज मोहि न भृंगा ॥ केवळ नाशाचि त्यासि निदान ॥ २ ॥

**गणूः**—बाहेर वामनराव आले आहेत. आपण सांगत असाल तर आंत घेऊन येतों !

**इंदिराः**—जा जा ! त्यांना लवकर पाठवून दे. तसेंच दोन पेले उत्तम दूध आण पाहूं ! आय मस्ट चेंज नॉउ विथ हिम ऑलटुगेदर ! ( वामनराव मोठा हार व बोके घेऊन येतो. ) वेलकम डीअर ! कमलॉंग लव्ह ! आय वॉज जस्ट एक्सपेक्टिंग यू.

**वामनः**—ओ थँक्यू डार्लिंग, थँक्यू डार्लिंग. आय ॲाम ऑल्वेज ॲट युअर सर्विस डिअर. [ हातांत बोके देतो. ]

**इंदिराः**—ओ थँक्यू. मच ओबलाइजड्.

**वामनः**—डोंट मेन्शन प्लीज. आय ॲम बट युअर सिन्‌सिअर डिव्होटी, खरोखर मनुष्याला रूप हें पूर्व पुण्याईनेंच लाभतें अशी माझी खात्री झाली !

**इंदिराः**—तर मग मला नाहीं वाटत माझ्या वांटणीला बरेंचसें पुण्य आलें आहे असं !

**वामनः**—छे, छे ! मीं इकडे येतांना जें पाहिलें त्यावरून माझी खात्रीच झाली.

**इंदिराः**—असें पाहिलेंत तरी काय बाई आपण आज ?

**वामनः**—एक कोलमाईन रस्त्यांतून धांवतांना पाहिली. छे, छे ! हॉरीबल ! काय तिचें तें रूप सांगू ! तिचे तें ओरँगोटग सारखें मस्क्युलर स्नायू, ऑस्ट्रेलियन कांगारूसारखे लांबसडक पाय, डेन्‌जर सिग्नलसारखे लालबुंद दिसणारे ते डोळे, आफ्रिकन लायनसारखें त्या सुंदरीचें तें आयाळ, रोडव्हेंनसारखा तो शरीराचा मजबूत बांधा व तिन्ही सीझनला दाद न देणारें, कॅनव्हससारखें परिधान केलेलें तिचें तें लुगडें ! अहाहा ! अजून डोळ्यासमोरचें हलतां हलत नाहीं. ही मालगाडी कुठून सुटली तेंही समजत नाहीं !

**इंदिराः**—मिस्टर वामनराव ! हाऊफनी यूआर आयसे ! आतांच्या

बाई, मला देखील या उपमांची संवय झाल्यासारखी झालेली दिसते. संगतीनें स्वभाव बनतो म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

**वामनः**—नाहीं, तुमच्याकडे पाहिलें म्हणजे एक कंपॅरिझन मनाला वाटली ती सांगितली.

**इंदिराः**—बरें, पुढें काय त्याचें! माझ्या सौंदर्याचे ॲडमायरर माझ्यापेक्षांही मला जास्त सुंदर दिसतात हो!

**वामनः**—हा तुझा नुसता विनोद आहे.

**इंदिराः**—नाहीं, मुळींच नाहीं! प्रथम प्रथम कदाचित् त्याला विनोदाचें रूप असेल, पण आतां त्याला अगदीं आधार आहे! बरें, पण कोलमाईनचें काय पुढें?

**वामनः**—त्याचें काय असायाचें. ती एके ठिकाणीं कंबरेवर हात टेंकून दुसऱ्या हातानें कोणाला हाक मारीत असतांना मीं पाहिली आणि विचार करीत, करीत तुझ्याइकडे आलों तों डोळ्यासमोरची मालगाडी नाहींशी होऊन एकदम मनोहर मेरमड् तूं दिसूं लागलीस! सांग बघूं त्या वेळेस ती मीं येतांना पाहिलेली सुंदरी कशी दिसत असेल?

**इंदिराः**—मला नाहीं बाई सांगतां येत. आपणच सांगायाचें होतें.

**वामनः**—हिंदुस्तानचा नकाशा घे पाहूं डोळ्यासमोर; सिलोनसारखीं तिचीं तीं पावलें, कारोमांडल मलबारकोस्टसारखे पाय, सह्याद्रि निलगिरीसारखे घोटे, नर्मदा, गोदा, कृष्णेसारख्या पोटावरच्या घड्या, मावळ, वऱ्हाडसारखा सपाट कटिप्रदेश. सातपुड्यासारखें उंच वक्षस्थल, कच्छभुजासारखा कंबरेवरचा एक हात, काश्मीरसारखें उंच--सखल आकुंचित डोकें आणि हिंदुस्थानांतील सुधारणेसारखा तिचा तो रंग, असा हा सगळा नकाशा पाहून मनाला वाटलें, कीं मॉडेल टीचिंगमध्यें नकाशाऐवजीं मास्तरलोकांनीं हिचाच उपयोग केला तर फार बरें!

**इंदिराः**—धन्य आहे बाई तुमची! वेल, वामनराव, लेट इट गो. पण गडे, माझी देखील पुढें अशीच का आपण थट्टा करणार? माझ्यावर देखील असेंच का प्रेम करणार? ( लाजते. )

**वामनः**—इंदिरे, तुझ्यावर प्रेम आणि वामनरावाचें! लाडके! मी तुझा उपग्रह आहें असें समज. एकवेळ पृथ्वीचा चंद्र तिचा त्याग करून

बुधाभोंवतीं हिंडूं लागेल, शनीचीं तेजःपुंज कडीं त्याला सोडून शुक्राभोंवतीं फिरतील, किंवा सर्व ग्रहगणमाला–सूर्याला सोडून धूमकेतूच्या मागें हिंडूं लागेल तरी देखील हा वामनराव आपल्या तुझ्यावरच्या प्रेमांत एक ग्रेनभर अंतर पडूं देणार नाहीं. इंदिरे ! छे, छे ! तिच्याशीं तुझी कॅंपरिझनच नको. कुठें तूं आणि कुठें ती !

**पद**–( खेलन को होरी राधे )

वदनप्रभा अवलोकुनि भासे ॥ ये क्षितिजावरि रविबिंबाचि हें ॥ नयन किरणगणिं हर्षुनि करिती ॥ व्योमविहारी गायन हें ॥ ध्रु० ॥ हास्य मधुर तव चैतन्या दे ॥ जणुं प्राण चराचरिं घालिति हे ॥ अरुणोदय समजुनि तुज देतिल ॥ अर्घ्य प्रदानहि द्विजगण हे ॥ १ ॥

कुठे वरोड्याची कोल माईन, आणि कुठे तूं गोवळकोंडा डायमंड माईन, कुठे ती आणि कुठे तूं !:कुठें हिंदुस्तानचा नकाशा आणि कुठे तूं अमेरिका ! मला तर तूं समुद्रांतून वर आलेल्या अमेरिके नागकन्येसारखी दिसतेस !

**इंदिराः**–ओ डिअर, ओ डिअर ! सगळ्या जगाचा जरी मला मोडा असला, तरी केवळ आपल्या ह्या स्पेशल ओरीजिनॅलिटीबद्दल, माय डीअर, आय ॲम ॲट यूअर सर्विस ! ह्या दासीला वाटेल ती आज्ञा करा. ( उठून उभी राहते )

**पद**–( बालम तोरि सूरतिया )

मोहुनि मम नेले हे प्रियकर पंचप्राण ॥ सकल दिगंतीं स्वर्योंचि नटला ॥ प्रेम हिऱ्यांची खाण ॥ ध्रु० ॥ हांसुनि खेळुनि प्रेमालिंगुनि, कंठु प्रिया अयुमान ॥ हंसासि हंसी, विनवि ही ॥ निकटिं ध्या, प्रिया न करा अनमान १ ॥

**वामनः**–माय डार्लिंग. तूं म्हणतेस हें खरें का ? छे, मला तुझे असे उद्गार स्वप्नासारखे वाटतात.

**इंदिराः**–छे ! तसलें गोड स्वप्न निरंतरचें कायम करणें आपल्या स्वा-

घीन असतांना कशाला उगीच विलंब ! मी आपल्याला जागें करायला तयार आहें ( जाऊन आलिंगन देते ) माय डीअर जागें व्हायचें हो गडे आतां.

**वामनः**–( तिच्या गळ्यांत मोठा हार घालतो ) तर मग हें असें गोड स्वप्न ह्या गार्लंडनें असें बांधून टाकतों.

**इंदिराः**—मी नाहीं गडे एकटीच या गार्लंडमध्यें रहाणार, आपणही यायचें हो ! ( तीच माळ त्यांच्या गळ्यांत घालून आलिंगन देते ) माझे पूर्वींचे सगळे अपराध आपण क्षमा करायचे हो डीअर ! आतां हा आपला जोडा कसा तरी बाई शोभतो पण !

**वामनः**—लाडके इंदिरे ! किती मनोहर दिसतो म्हणून सांगू—

पदः–( नका टाकूनि जाऊ डावा डोळा० )

दिसे पोपट मैनेचा जोडा तरूवरी बसला ॥ प्रातःकालीं किरण पडतां बोले मंजूळ मंजुळ बोला ॥ ध्रु० ॥ निकटि चंचू करुनि चुंबी, फुगवुनि हरित पंखाला ॥ १ ॥ नाचे, डोले बोले खेळे, कुरवाळोनि सहचरणीला ॥ २ ॥

**इंदिराः**–बरेंच जिवस गडे तुम्हांला विचारीन म्हणतें, पण आजच्यासारखी हक्कानें विचारायची मेली संधीच आली नव्हती. मी विचारतें त्याचा राग नको हो यायला, आणि जरी आला. तरी मी ही अशी मिठी मारून, ( मिठी मारते ) त्याला मुळींच जवळ येऊं देणार नाहीं. खरेंच गडे, आपल्याला ह्या इंग्लिश सीमिलीज आणि ह्या असल्या उपमांची कशी बाई संवय लागली ?

**वामनः**–स्प्लेंडिड. बरें झालें, आजच्या आजच उलगडा होत आहे ! लाडके, आज वीस वर्षें मी सारखा मराठी आणि संस्कृत कवितांचा व इतर लेखांचा अभ्यास करीत आहें. आज पर्यंतच्या अगदीं १९१६ पर्यंतच्या बहुतेक कवींच्या कविता वाचल्या. पण कमल, विमल, लोल, विलोल, कल्ल, लल्ल, प्रफुल्ल, गल्ल, मल्ल, सकल, विरल, विकल—

**इंदिराः**–डोंबल मेल्याचें !

**वामनः**—तसेंच तुंग, चंग, कंद, भृंग, गुंग, संघ, भंग, कदंब, नितंब, मलंग, अनंग, मदंग—

**इंदिराः**—मारुतीचा भुंकारच हा—

**वामनः**—विकट, प्रकट, खट, निकट, पट, शठ, हट, भट, कटि, तटि भ्रकुटि, हिंपुंटि—

**इंदिराः**—कशाला बाई, नसत्या खटपटी नि लटपटीचें तिखट मीठ हें?

**वामनः**—लाडके, एका मिनिटांतच कंटाळलीसना. पण आज वीस वर्षें ही मगरामिठी मी सहन करतों आहें? कालेजांत जेव्हां बाणभट्ट, भवभूति वगैरे उरावर बसले तेव्हांचें तर विचारूंच नको. सगळ्या प्रोफेसरांसहित आम्ही स्टूडंटस एक वेळ समासांच्या लांब लांब बोगद्यांत शिरलों म्हणजे पंधरा पंधरा दिवस अंधारगुडूप ! आणि त्यांतून जों जीव घेऊन बाहेर निघतो तों, नलिनीचें तंतु, चंद्राचे किरण, अधरबिंबांचीं तोंडलीं, आमरसाचें भाषण, आणि युवतींचें अधरामृत यांच्या मेजवान्यांवर मेजवान्या सुरू झाल्या. मला तर इतकें अजीर्ण झालें कीं, मी कांहीं दिवस आजारी पडलों. शेवटीं एक दिवस मीं या गोष्टींच्या पुनरुच्चार न करण्याबद्दल शपथ वाहिली आणि नालिनीच्या उपटलेलेल्या तंतूंचे चंद्र किरणांनीं भारे बांधून गजेंद्रमदहराविलासिनींच्या शुंडादंडांत देऊन टाकले. कमलिनींच्या तंतूंची गुंतवळें निवांत बसून विंचरायला मला मुळींच वेळ नाहीं. त्याच्या करितां शेंकडों प्रेमांचे पिंजारी आपआपले कंगवे साफ करून तयार आहेतच; मग मी कशाला आणखी उपद्व्याप करूं ?

**इंदिराः**—आपलें हें सर्व भाषण ऐकून मला देखील तिटकारा आला. मी देखील आतां आपल्यासारखाच निश्चय करणार गडे. ( इतक्यांत दुधाचे पेले गणू आणून देतो.)

**इंदिराः**—हे घ्या !

**वामनः**—नाहीं ! प्रथम तूं घे ! स्त्रियांचा पहिला मान असतो !

**इंदिराः**—पण आमचा मानपान सगळा तुमच्याच जिवावर असतो ! तें कांहीं नाहीं ! हं घ्या हें ! आतां मी सांगेन तसें ऐकाचें हो !

**वामनः**—बरें आण मी घेतों—( तो हातांत कप बशी घेऊन पितो. तीहि पिते. पिण्याचे आधीं दोघेंहि कप एकमेकांस लावतात. )

**इंदिराः**—असल्या निष्कपट, निष्कलंक प्रेमाचा मीं अनादर केला ह्याबद्दल मी पुन्हां पुन्हां क्षमा मागतें. आजपर्यंत मीं केलेला आपला अनादर, निष्ठुर भाषण, अपमान, वगैरे सगळा सगळा पदरांत घ्यायचा हो. खरेंच बाई—

पद—( कुशलि बहु नांदतो. )

आजवरि वंचिलें प्राणनाथा ।। नाहीं तें बोललें प्राणनाथा ।।
।। ध्रु० ।। कामिनि सरिता मी अति चंचल ।। विश्रुत
जगतीं स्त्री उच्छृंखल ।। गंभिर सागर परि असती नर ।। स्व-
किय वदा ।। किंकरीही प्राणनाथा ।। १ ।।

**वामनः**—ओ, नेव्हर माइंड, नेव्हर माइंड. अहाहा ! लाडके, मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ? कोलंबसाला अमेरिका सांपडल्यानेंहि झाला नसेल! हिमालय ओलांडून चिनी सुंदरी हरण करणारा, इंग्लंडांतून फ्रान्समध्यें पोहून जाणारा, मार्कोनीवायरलेसचा शोध करणारा, किंवा दक्षिण ध्रुवावर निशाण लावणारा कॅप्टन स्कॉट याला साउथ पोलडिस्कव्हरीबद्दल जेवढा आनंद झाला असेल तितकाच तूं प्राप्त झाल्यामुळें मला होत आहे, आणि या साउथ पोलडिस्कव्हरीच्या आनंदाचें सर्व श्रेय मला देणें लाडके इंदिरे ! केवळ तुझ्या, तुझ्याकडे आहे.

**इंदिराः**—मला देखील बाई पॅरेडाईजरगिन्डसारखें झालें आहे हो !

**वामनः**—चल तर प्राणसखे इंदिरे ! आपल्या अमोल सुखाचा एक क्षणहि या ठिकाणीं आतां वायां घालवूं नये. कारण—

पद—( मेरे दिलकु चुराके )

जाई, क्षण, जो जगीं, तो पुन्हा ना मिळे ।। हीं पळतीं
पळें न मागें वळे ।। ध्रु० ।। महाकाल हें विश्व जयीं निर्मिलें ।।

करोनी प्रयत्नासि वळवी बळें ॥ तयालाहि आतां न तें आकळे ॥ धनू त्यागितां शर न जेवीं खळे ॥ १ ॥

इंदिराः—

गळ्यांत गळे ॥ घालुनि गडे ॥ पुरवुं लळे ॥ जगिं सगळे ॥ चला आपुले ॥ २ ॥ स्फुरण करित नभिं चपला तेंवि भोग लोकीं ॥ नीर भग्नघटिं झिरपे तेंवि आयु हें विलोकीं ॥ ३ ॥

वामनः—

क्षणभंगुर सारा ॥ दिसे हा पसारा ॥ नच सौख्य थारा ॥ जगीं पामरा ॥

इंदिराः—

शशि, सूर्य, तारा, ध्रुव ही चळे ॥ ४ ॥



# अंक पांचवा.



## प्रवेश १ ला.

———:o:———

सीनः–( राधेचें घर. गोपाळ, चंपा. )

**गोपाळः**–काय ग चंपे ? तूं म्हणालीस कीं, राधेला अजून शंकररावाचा मूर्खपणा चांगलासा दृष्टीस पडला नाहीं, हें खरें का ? मला नाहीं वाटत यांतलें एकहि अक्षर खरें असेल म्हणून !

**चंपाः**—अहो ! दृष्टीस पडणार कसा ? आणि जरी पडला, तरी मी आधींच, ते आज अशी गंमत मुद्दाम करणार आहेत, असा कानमंत्र सांगून ठेवायला चुकेन तेव्हां ना ? त्यामुळें सगळा मूर्खपणा थट्टेवारीं आजपर्यंत गेला ? शिवाय त्यांचें पूर्वीं शंकररावावर प्रेम होतें खरेंच; पण गोविंदरावांनीं तिचें लग्न केशवरावांबरोबरच लावायचें असा हट्ट धरल्यापासून तर तिचा ओढा शंकररावाकडे अधिकच लागला.

**गोपाळः**–मनाला आळा घालायला लागलें, म्हणजे प्रथम प्रथम तें फार अनावर होतें, हें खोटें नाहीं.

**चंपाः**–आणि ह्याचप्रमाणें शंकररावांची प्रत्येकांनीं केलेली निंदा त्यांना उलट स्तुतिच वाटूं लागली. कारण तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं, ही निंदा मुद्दाम शंकररावांच्या आणि तिच्या लग्नांत मोडा घालण्याकरितांच आहे म्हणून—

**गोपाळः**–ठीक जमलें ! आयतेंच आपल्या पथ्यावर पडलें. बरें, पण काय ग तो थेरडा बसला आहेना, रात्रंदिवस केशवरावाचा जप घेऊन ? मग कसें जुळणार हें सगळें ?

**चंपाः**—जमेल हो सगळें. आपण आहांत ना चांगले पंचाक्षरी जमवायला ! मग कसली नड पडणार आहे ! शिवाय आणखीं नाहीं ऐकलेंस ? त्या केशवरावाचें तर अख्यानच आटोपलें म्हणे ! काल त्या केशवरावांच्या कोर्टांतल्या कामाचा निकाल त्यांच्या उलट झाला.

**गोपाळः**—तर मग शंका घ्यायला आतां कारणच उरलें नाहीं.

**चंपाः**—अहो, सगळीं शेतेंभातें नि घरेंदारें गेलीं त्यांच्या भाऊबंदांना कर्जांत, उरलें आहे काय धोंडे आतां ?

**गोपाळः**—अगदीं सोळा आणे काम झालें. आतां तो थेरडा केशवरावाचा नाद खात्रीनें सोडील. काय ग चंपे, तुला एक अगदीं आंतल्या आंतली गोष्ट विचारतों. पण कुठें ब्र काढायचा नाहीं. काय ग, आतांशा गोविंदरावांचीं नि आमच्या सुंदराबाईचीं दोन दोन प्रहर कसलीं ग खलबतें होत असतात ?

**चंपाः**—ऐकतें खरेंच बाई असें ! नेहमीं वेळ सांपडला कीं, सुंदराबाई तरी इकडे येतात, नाहीं तर हे तरी तिकडे जातात. नेहमीं बोलायचें झालें तरी, अगदीं जवळ जवळ बसून बोलायचें !

**गोपाळः**—अग, पण इतकें जवळ जवळ ? काय ग पण हें या वयांत आतां बुढ्ढी घोडी नि लाल लगाम पाहिजे कशाला ?

**चंपा**—या स्त्रीशिक्षणाच्या काळांत अशी कोणी शंकाच घेऊं नये ! जवळ बसलें म्हणून काय झालें ? हे पहा बाई काय तें, ज्याचें दुःख त्यालाच विचारावें ! इतरांना काय होतें रिमामी टीका करायला !

**गोपाळः**—अग, पण हें देखील आपल्या पथ्यावरच आहे. सुंदराबाईचें आतां गोविंदरावावर चांगलें वजन आहे, तेव्हां त्यांनीं नाक दाबलें गोविंदरावाचें, म्हणजे त्यांचें शंकररावाला राधेविषयीं होकार द्यावयाला तोंड आपोआपच उघडेल. बरें, हें सगळें दुसऱ्याचें भारूड झालें; पण आतां आपल्या आख्यानाला प्रारंभ केव्हां ?

**चंपाः**—थांबा, गप्प बसा, गप्प बसा; त्या पहा राधाबाई इकडेसच येताहेत. ( राधाबाई प्रवेश करते. )

**राधाः**—चंपे, इकडे कसल्या गोष्टी करीत उभी आहेस ? तिकडे—बाबांच्याकडे सुंदराबाई आल्या आहेत, त्यांना चहा करून द्यायला बाबा हाक मारतील हो ! काय ग, कसलीं येवढीं खलबतें तुमचीं ?

**गोपाळः**—अहो, खलबतें कसलीं चालायचीं आहेत ! कां, तुम्हीं आपला बेत शंकररावाविषयीं फिरविलांत वाटतें ?

**राधाः**—तसें नव्हे. फिरवायला काय झालें. सगळ्या गांवांत शंकर-

रावाला मूर्ख म्हणतात आणि तुम्हीं दोघें तेवढीं तो विनोदी आ
म्हणता ! पण माझी म्हणाल तर, मुळींच अजून बाई खात्री झाली
एक वेळ चुकून लग्न लावून बसलें, म्हणजे माझे मींच आपल्या
धिंडवडे काढल्यासारखें नाहीं का हें होणार ? तें कांहीं नाहीं, माझी
झाली पाहिजे प्रथम, मग सगळें.

गोपाळः–हातच्या कांकणांला आरसा कशाला ? आज तो म्हणजे
लहानसानांतला मनुष्य नाहीं ! इतक्या पदव्या मिळविलेला; इतका
चार लाखांचा धनी, आणि इतका विनोदी स्वभाव, आणखीं का
हिजे जास्त ?

चंपाः—( गोपाळरावांच्यापेक्षां खरेंच एका गोष्टीनें हें स्थळ
चांगलें. पण आपल्याला लाभायला हवेंना ? )

गोपाळः—आणि मी म्हणतों, मूर्ख आणि शहाणे एका दृष्टीनें
च नाहींत का ? सगळें सुसंगीत, सुंदर कुठलें असायचें ? कांहीं थोडी
असायचीच; तिच्याकडे कानाडोळा थोडा केलाच पाहिजे.

राधाः—मग ते मूर्ख आहेत असा तुमचाच कबुली जबाब आहे

गोपाळः—वाहवा, चांगला अर्थ काढता तुम्ही ? शंकररावाला
म्हणायला चांगला अंधळा असायला पाहिजे ! अहो, त्यांच्यासारखा
तबला, सतार, अलगूज वाजविणारा सगळ्या मुंबई इलाख्यांत
सांपडायचा !

राधाः—खरेंच कीं काय ? तर मग गडे चंपे, एक वेळ त्यांचें
गूज ऐकायचेंच गडे ! सगळ्यांत मंजुळ सूर अलगुजाचाच असतो
उगीच नाहीं, त्याला नागसूर म्हणत आपल्यांत ? तसल्या आवाजानें
षारी प्राणी देखील मोहित होतो ! त्यांना कांहीं गोड गाणें वगैरेही
का ? खरेंच बाई, गाण्यासारखें दुसरें मोहकच नाहीं !

गोपाळः–छे, छे ! गाणें मात्र बेताचेंच. अगदींच नाहीं
तरी चालेल. ( बाळाचा आवाज अगदीं खडा ! त्याला सूर देणारी
सांपडली पाहिजेना वेळेवर ? एखाद्या वेळेस पेटीच्या सुरांत मिस
म्हणजे ओळखायचा देखील नाहीं. )

**राधाः**—सध्यां गाणें नसलें तरी चालेल, पण अलगूज ऐकायचेंच गडे ?

**गोपाळः**—बरें, हें सगळें खरें, पण आपल्याला सर्व ऐकायला निवांत वळ कसा सांपडेल, गोविंदराव असले तर घरीं ?

**चंपाः**—त्याची नको काळजी, आजच सुंदराबाई व गोविंदराव संध्याकाळीं बरोबर फिरायला जाणार आहेत. तसेच तिकडे-सुंदराबाईच्याकडेच परस्पर जेवून रात्रीं नाटकाला जाणार आहेत जरासंघाला !

**राधाः**—त्याची नको मुळींच तुम्हांला काळजी ! बरें, तर आम्ही घरांत जातों आतां. तिकडे बाबा हाक मारतील. ( मनांत पुष्कळ आहे, पण साधलें पाहिजे ! बरें; यांना मी फसवीन तरच मीही पण नांवाची राधा ! ) (जाते.)

**चंपाः**—गोपाळराव, शंकररावांना अलगूज येतें तरी का ? कुठे बाई एवढें शिकले तरी ते ?

**गोपाळः**—तुला काय त्याचें, त्यानें वाजावेलें म्हणजे झालें ना ?

**चंपाः**—बरें तर, जातें मी देखील. मग संध्याकाळीं यायचें ठरलें बर का ? ( न कां येईना कांहीं देखील शंकररावांना वाजवितां ? मला त्यांच्या रुपयांचाच नाद त्यांच्या अलगुजापेक्षां किती तरी गोड आणि मंजुळ वाटतो. साधेल तेव्हां खरें. ) ( जाते. )

**गोपाळः**—आतां सगळ्या गमती तर पुढेंच आहेत ! पण आमचा हा नर्मद्या वेळेवर काय करतो देव जाणे ! हा पहा आलाच आमचा प्रो० कृषिकर्म ! बाकी आजच्या जलशाला मजा येणार खास ! हे पहा, आलेच यजमान ! ( शंकरराव प्र. क. )

**शंकरः**—कायरे, तुला शोधावा तरी कुठे ? आज इतका वेळ कुठें काळें केलें होतेंस ? कां असा चेहरा उतरला आहे, कांहीं जमत नाहीं वाटतें ? जमव बाबा कसें तरी आमचें हें एकदां, म्हणजे गंगेंत घोडे न्हाले !

**गोपाळः**—सगळें जमलें आहे, पण तुम्ही जमवाल तेव्हां खरें ना ? तुम्हांला उत्तम अलगूज येतें म्हणून मीं राधाबाईंना थाप दिली आहे. इतकेंच नव्हे तर, आज संध्याकाळीं ते तुम्हांला प्रत्यक्ष वाजवून दाख-

वतील म्हणून कबूल केलें आहे, आणि इकडे तुमच्याकडे पहावें तो सर्व आनंदच आहे. म्हणून विचारांत पडलों आहें. तेव्हां अलगूज—

**शंकरः**—हा वेड्या ! अलगुजाची बिशाद काय आहे ! अरे—

पद–( शामरे बैंया धरोना )

ऐकवीन मी सुरेल गाना ॥ मोहिन रमणी मारुनि ताना ॥ध्रु०॥ यमन भूप भैरवि सारंगा परिसुनि तज्ञहि लववित माना ॥ १ ॥ गंधर्वादिक मशक बापुडे, गानश्रवणीं येतिल रानां ॥ २ ॥

मी कॉलेजांत असतांना चतुरशिंगीच्या रानांत फिरायला जाऊन तासच्या तास वाजवीत होतों ! अरे वेड्या, गाई-म्हशी देखील गुराख्याच्या तावडींतून पळून माझ्याभोंवतीं उभ्या रहात. इतकेंच ना ? अंः त्यांत काय आहे ! शिवाय बरेच दिवस मी गायनसमाजाचा प्रेसिडेंट होतोंच ! तुझा तो अलगूज का फिलगूज असा दोन्ही हातांनीं सपाटून वाजवितों कीं, तूं नुसता पहातच रहा ! मग तर झालें कीं नाहीं ?

**गोपाळः**—चला हो ! मला नको दगदग ! तरी मला वाटलेंच कीं, तुम्ही याल आपल्या गतीवर ! हां मी सांगून येतों त्यांना कीं आम्हांला कांहीं एक वाजवितां येत नाहीं आणि त्याची जरूर नाहीं. मी कशाला उगीच जिवाचा आटापीट करून घेऊं, माझें काय घोडें खोळंबलें आहे ? जातों बाबा मी. ( जाऊं लागतो व शंकरराव अडवतो )

**शंकरः**—हें कायरे गोपाळ ? तूं तरी भारीच तिरसटशिंग आहेस. अरे, तूं सांगशील तसें करतों, मग तर झालें ना ?

**गोपाळः**—मग म्हणा तर आधीं, मीं अलगूज पाहिलें नाहीं, लाकडाचें असतें का कागदाचें असतें तें ठाऊक नाहीं ! मला वाजविल्याचें स्वप्नांत देखील आठवत नाहीं ! अलगुजाला एक भोंक असतें का दोन भोकें तेंही ठाऊक नाहीं. इतकेंच नव्हे तर, तें नगाऱ्यासारखें असतें का तुणतुण्यासारखें असतें तेंही मला ठाऊक नाहीं !

**शंकरः**—( सर्व म्हणतो. ) तूं तरी अगदीं कीस काढणाराच दिस-

तोस ? ( करतां काय, गरजवंताला अक्कल नाहीं. ) बरें, पण आतां झालें ना तुझ्या मनासारखें ? अगदीं तुझ्या इनस्ट्रक्शनसारखें करतों. एक अक्षरही पदरचें घालीत नाहीं.

**गोपाळः**—हां मग ऐका तर, मी आणतों दोन अलगुजें. एक तुम्ही घ्या, व एक मी घेतों. मला अलगूज थोडें थोडें येतें आणि त्यांतूनही मी आतां दोन गति बसवून ठेवतों. पुढें तिथें आपण गेलों आणि सुरवात केली म्हणजे तुम्ही नुसतें मान हालवून, गाल फुगवून, मांडी आपटून आणि बोटें चाळविल्यासारखें करावयाचें. जसें कांहीं तुम्हींच वाजवितां असें सगळ्यांना वाटलें पाहिजे; मी तुमच्या पाठीमागें जसा कांहीं सूर द्यायला बसलों आहें असें दाखवून मी सर्व गाणें वाजवितों. पहा, पुन्हां लक्षांत ठेवा !

**शंकरः**— हं ठेवतों लक्षांत, पुढें सांग.

**गोपाळः**—हें पहा, ताल धरण्याकरितां ही अशी मांडी हालवतों, आलें लक्षांत ? हा सम मीं दाखविला म्हणजे तिकडे लागलीच तुम्हीं सुरवात करावयाची, समजलास ? कशाला सांगा पाहूं चटकन् ?

**शंकरः**— अलगूज वाजवायला !

**गोपाळः**—अहो खंदक, नाहीं ! आतां काय करावें ! जसें कांहीं तुम्हीच वाजवितां अशी बतावणी करायला, आलें लक्षांत ?

**शंकरः**—ठीक आहे, बतावणी करायला; ( घोकतो ) आतां नाहीं विसरणार ! हं पुढें चालू कर, आलें लक्षांत मागचें सर्व !

**गोपाळः**—हं, पुढें हें पहा, गाणें, हा असा सम मांडीनें दाखवून, संपवीन कीं, लागलीच तुम्ही बोटें चाळवायचीं बंद करा.

**शंकरः**—बस् ! बस् ! बस् ! जमलें आतां सगळें ! !

**गोपाळः**—अहो, तुमचें लग्न केव्हांच संपून एव्हांना चार पोरेंबाळें होऊन जुनेपुराणे झाला असतां ? पण तुमच्यांत कांहींच राम नाहीं असें तिला वाटल्यावरून तर हें इतकें लांबणीवर पडलें ! बघतों आतां कसें काम पार पाडतां तें ! हें शेवटचेंच मात्र ! छे ! तुमच्या अकलेपुढें माझी तर लोटांगणें घालायची पाळी आली बाबा !

**शंकरः**—आतां नकोरे तुला त्याची काळजी ! हें पहा, असें आजपर्यंत

समजावून सांगितलें असतें तर, कशाला एवढा घोटाळा झाला असता? आतां हें असें समजावल्यावर कोण बरें चुकेल? पहा तर खरें, अशी मजा उडवून देतों कीं, तूं पाठच थोपटली पाहिजे?

**गोपाळः**—ठीक आहे, चला तर आपण आधीं अलगुजांच्या तयारीला लागूं! (जातात.)

---

# प्रवेश २ रा.



**सीन**—( रस्ता बागेचा. सुंदराबाई व गोविंदराव. )

**सुंदराः**—मला बाई आतां अगदीं कंटाळा आला आहे, ह्या क्लबाचा! चार दिवस म्हटलें मेलें चांगल्या एकमेकी मिळूं-मिसळूं, सगळ्याजणी कांहीं तरी चांगलें शिकूं-सवरूं, सुग्रास खाऊं-पिऊं, चांगलें सगळ्याजणी आंगाखांद्यावर घालूं—नेसूं, आणि तसें आतांपर्यंत कसें नीट, सुरळीत, बिन बोभाट चाललें देखील हो! पण आतांआतांशा आमच्या क्लबाचा रंग पालटल्यासारखा व्हायला लागला आहे! तें आमचें ब्रीदच आहे म्हणा! तेरड्याचा रंग तीन दिवस! किती तरी पैसे मिळवले हो मी क्लबाकरितां! सगळा क्लब कसा अगदीं राजवाड्यासारखा श्रृंगारला होता! म्हटलें मेलें सगळ्या आपण समदुःखी, तर आपणच आपल्यांतल्या आपल्यांत तरी चार दिवस एकीमेकींला सुख लावूं या! पण कसलें जुळणार तें! काय ती मी त्यांच्या सगळ्यांत वडील! मला आपल्या सगळ्याजणी मान दे होत्या, म्हणून मीं तरी एवढी खटपट केली जिवापाड. पण पुढें ह्या आपल्या एक एक मार्ग काढूं लागतील हें कुणाला स्वप्न का पडलें होतें? बोटिंग क्लब, थीएटर बिल्डिंग, मुळामुठा, स्विमिंग असोसिएशन. किती किती मी माझे प्लॅन्स सक्सेस फुल केले हो! मी तरी मग कशाला येवढा माझ्या जिवाचा आटापीट करूं? माझें तरी वय का गेलें आहे अजुनी? मेले जरा केंस भुरकट नि जून दिसले म्हणून हौस का जून झाली आहे? हौस जशीच्यातशीचि अजून कोवळी आहे हो! माझ्या जर मनासार

झालें तर देवानेंच केलें. किती जरी झालें तरी ह्या मैत्रिणी म्हणजे हलवायाच्या दुकानांतल्या माशा ! सगळ्या आपल्या पानावर तूप ओढणाऱ्या निघाल्या, मग मी तरी कशाला उगीच कमी करूं ? तुंगाबाईचें तें तसें ! पण बाई आपले विद्याधर मास्तरांनीं आतां पुनर्विवाह लावायचें ठरविलें ! राहो बिचारी मुलेंलेंकरें घेऊन सुखांत ! दामिनीचें डाक्तरांशीं जुळलें म्हणून ऐकतें, बरें झालें, एक परी ! माझ्या इंदिरेनें तर वामनरावांशीं बतावणीची सुरवात करून खरोखरीचीच बतावणी केली. बरें झालें बिचारीचें, तिनें फार कष्ट काढले हो ! दुसऱ्याचें चांगलें चिंतन केलें म्हणजे देव आपल्याला देखील मुळींच लांब नसतो असें म्हणतात ! अग बाई, यायचें झालेंच वाटतें इकडे ठरल्याप्रमाणें ! ( गोविंदराव प्रवेश करतो. )

**गोविंदः**—कां, कसला विचार चालला आहे एकांतांत आपल्याशींच ?

**सुंदराः**—कसला चालणार दुसरा ? आपआपल्या सुखदुःखांचाच झालें ! म्हटलें, आजपर्यंत चाळीस वर्षें ठीक गेलीं. कसे तरी हात-पाय चालत होते. पण सगळ्या वेळा सारख्या का असतात ? त्याच्यांतून मेलें मला पोर ना बाळ !

**गोविंदः**—अगदीं बरोबर, अगदीं बरोबर ! कसें माझ्या मनांतलें बोललांत ! अशी स्थिति माझ्यामागें देखील आहे. तेवढी एक मुलगी काय ती राधा ! ती उद्यां आपल्या घरीं गेली म्हणजे आहे का कुणी मला ? पुष्कळ धनदौलत आहे, नोकरचाकर आहेत, सगळें कांहीं आहे; पण सुंठ तरी उगाळून द्यायला खरें-खरें जिव्हाळ्याचें राहिलें का कुणी ? त्या केशवरावांचा तो तसा खटल्याचा निकाल झाला, म्हणून ते एकदम वैतागून निघून गेले साताराला !

**सुंदराः**—मग आपण त्या शंकररावांच्या आणि राधाबाईच्या आड कशाला बाई येतां ? लोखंडाला चुंबक ओढून नेतो, किंवा चुंबकाला लोखंड ओढतें. कांहीं, असेना ? तो मुळींच विजोड नाहीं ! राहिनात कां एकमेकांला या संसाराच्या थंडी-वाऱ्यांत जवळ करून !

**गोविंदः**—माझ्या देखील हेंच मनांत आलें, आणि म्हणूनच मीं देखील आतांशा तिच्याकडे कानाडोळा केला.

सुंदराः—खरेंच बाई, नाहीं तर काय ? जबरदस्तीचा सवदा काय कामाचा ! होतां होईल तों प्रेमालाच वरपसंती द्यावी !

गोविंदः—बरोबर आहे, प्रेम जरी आंधळें असलें तरी–

सुंदराः—आपल्या ठिकाणावर नेमकें जातें–असेंच कीं नाहीं !

गोविंदः–हो तर काय ? माझी देखील ही सर्व स्थिति लक्षांत आली म्हणजे मला देखील कोणी तरी जिवाचें असें करावेसें वाटतें–वाटतें पण, मिळालें पाहिजे ना ?–या दिवसांत ज्याचा त्याचा नुसत्या पैशावर डोळा !

सुंदराः—बाई, बाई, आतां काय करूं तरी बाई ! अगदीं मी हेच-हेच शब्द म्हणणार होतें हो ! देवानें तुमच्या व माझ्या स्थितींत इतकें अक्षरशः साम्य घडवून आणलें, त्यांत त्याचा हेतु काय असेल तो न कळे !

गोविंदः—असायचा काय? (विचारूंच का आतां लाज सोडून) सम-दुःखी एके ठिकाणीं करून एकमेकांला आधार द्यायचा असेल झालें !

सुंदराः–तसला सुंदर संकेत जर बाई, त्या चतुर विधात्याचा असला– ( विचारूंच का आतां पार सगळी लाज सोडून ? ) तर आपण तरी अज्ञानी माणसांनीं त्याच्या आड कां यावें बाई ?

गोविंदः–मी मुळींच आड येत नाहीं. हा पहा, मी डोळे मिटून घेतों.

( डोळे मिटून उभा राहतो. )

सुंदराः–हें पहा, बाई काय तें ? मी तरी कशाला दूषणाला अधि-कारी होऊं ? हे पहा, मी देखील डोळे मिटतें. ( डोळे मिटून जवळ जाते व एकमेकांस आलिंगन देतात. )

गोविंदः–माझें मला मिळालें. अगदीं घरीं चालत आलें !

सुंदराः—माझें देखील अगदीं तस्सेंच झालें हो ! चला गडे, कांहीं कुणाची भीति नको ! आतां आपलें राहिलेलें आयुष्य अस्सें डोळे मिटून आनंदानें घालवूं या ? आपल्या बरोबरीचे समवयस्क आपलें आभिनंदन करून सहानुभूतिच दाखिवतील हो !

गोविंदः—त्यांनाच खरें मर्म समजेल यांतलें ! इतर हंसतील चार रिकामटेकडे लोक ! पण, कंबर दाबायला होतें का कुणी तयार ! हंसा-यला काय होतें फिदी फिदी नुसतें ! ( जातात. )

# प्रवेश ३ रां.

—:०:—

**सीन**—( राधेची ड्रॉइंगरूम--चंपा, राधा, गोपाळ व शंकरराव. )

**राधाः**—चंपे, तूं कांहीं म्हण ! पण मला नाहीं गडे तसें वाटत अजुनी. मनुष्यानें किती जरी आव आणला, उसनें ऐश्वर्य आणलें तरी तें किती दिवस टिकणार ? कधीं ना कधीं तरी तें उघडकीस आल्यावांचून का राहणार आहे ? खरेंच, माझ्या मनांतलें उघड उघड सांगू का ? मला किं नाहीं बाई, ह्या शंकररावांपेक्षां गोपाळरावच शतपट चतुर दिसतात. ते जरी गरीब असले तरी माझे बाबा त्यांना श्रीमंत केल्याशिवाय ठेवा-वयाचे नाहींत.

**चंपाः**—अस्सें अस्सें ! राधाबाई, आज थोडी दृष्टि निराळी दिसते आहे तुमची ! तरीच म्हटलें अलीकडे गोपाळरावांची स्वारी दृष्टीस पडली कीं इतकी कळी कां उमलते ? आतां समजलें ! काय ग, बरीच::कीं ग आहेस !

**राधाः**—तसें नव्हे, आतां माझ्या मनांतलें तुला नको सांगूं तर सांगूं तरी बाई कोणाला ? केशवरावांचें तें तसें झालें, बरें झालें मेलें, औषध-वांचून खोकला गेला तो ! आमच्या बाबांचा तो तसा स्वभाव, मग क-रायचें तरी काय बाई मनुष्यानें ?

**चंपाः**—( हिचें आतां थोडें मन पाहिलें पाहिजे. ! ) अग होय, पण एकदम एखाद्या भिकाऱ्यावर मन जाऊं देणें हें तरी चांगलें का ? हंसेल कीं सगळें जग !

**राधा**—पण मग मी तरी काय करूं बाई ! ह्या माझ्या वेड्या म-नाला ? हंसेना कां मेलें हें टवाळ जग ! तें कांहीं नाहीं गडे, नुसते तुला पैसे पाहिजे असतील तर घाल जा तूं त्या शंकररावाला माळ !

**चंपाः**—( बरं झालं ! आतां आपण पडत्या फळाची आज्ञा घ्यावी. ) घालीन, घालीन हो त्या शंकररावांना माळ ! काय झालें आहे त्यांना, ते तरी मनुष्यच आहेत ना ? (असेना का मेला ठोंब्या तो, पण आज दोन चार लाखांची जिनगी तर आहे ना ! अगदीं कंटाळा आला आहे बाई

मला ह्या अशा परस्वाधीनपणाचा ! )बरें, पण तुमचा बेत गोपाळरावांशीं तरी आतां नक्की ठरला का ?

**राधाः**—हो, अगदीं नक्की ठरला, तुला नाहीं ना त्यांत कांहीं वाईट-वांकडें दिसत ?

**चंपाः**—इश्श, वाईटवांकडे काय असायचें त्यांत; मग ठरला ना अगदीं ? द्या तर शपथ म्हणजे खरें समजेन.

**राधाः**—अग, तुझी शपथ, मी कशाला तुझ्याशीं प्रतारणा करूं ? पण, तुझा झाला ना ठाम निश्चय ? दे तर शपथ.

**चंपाः**–( माझें काय मेलें त्यांत वावगें होतें. आईबाप भीक मागताहेत तिकडे सातारला, नि भाऊ उकिरडे फुंकताहेत दिवसभर ! असें हें मेलें भाग्य उदयास यायचेंच झालें तर माहेरचीं तरी खातील पितील ! ) ठरला हो, अगदीं ठाम निश्चय झाला ! अगदीं तुमची शपथ !

**राधाः**–तर मग चंपे, ( कानांत सांगते ) सगळा पुढचा बेत असा– ठकाला महाठक भेटूनच काम साधलें पाहिजे. ( पुन्हां कानांत सांगते ) पण पहा हो, वरपांगी तसेंच बोलायचें सगळें. तुझ्यावर अवलंबून आहे. अशी बतावणी झाली पाहिजे शेवटपर्यंत कीं, गोपाळरावांनीं थक्कच झालें पाहिजे.

**चंपाः**—शर्थ आहे हो बाई तुमची !

**राधाः**–अगदीं मागमूस देखील त्यांना लागतां कामाचा नाहीं बरें का?

**चंपाः**—ठीक आहे ! अगदीं आतां तुम्हीं सांगितलें तसेंच करतें, मग तर झालेंना ? अग बाई, हे पहा शंकराव नि गोपाळराव आलेच वाटतें!

**गोपाळः**–( गोपाळ व शंकरराव प्रवेश करतात. ) मीं सांगितलेलें सर्व नीट आहेना लक्षांत ! पहा बरें, नाहीं तर सगळें फसेल ! शुद्धीवर अ-हांत ना ?

**शंकरः**–अगदीं बेमालून काम करतों, त्याची नकोरे तुला काळजी !

पद—( चलों एको वा मनुवा )

**मना राहीं क्षण सखया, धीर न सोडीं ॥ जिंकुनि चातुर्यें मिळवी जन्माची जोडी ॥ ध्रु० ॥ कविस्फूर्ति ही मूर्तरूपें**

तुज पुढती नटली ॥ आलिंगुनिया तुला वराया उत्कंठित झाली ॥ १ ॥ मुळासकट नच खावा जरि धरि इक्षुदंड गोडी ॥ न हो उताविळ मना ! थांबरे न करिं घडामोडी ॥२॥

वेल हॉउ आर यू गेटिंग ऑन मिस राधाबाई ?

**राधाः**—ओ क्वाइट वेल मिस्टर शंकरराव ! कम लॉंग ! टेक युअर सीट;

**शंकरः**—ओ थँक्यू ( खालीं बसतो व गोपाळराव त्याचे मागें बसतो. ) आज हा अगदीं अलभ्य लाभच म्हणायचा !

**राधाः**—छे, छे ! आम्हांलाच उलट आहे अलभ्य लाभ आजचा !

**चंपाः**—तर मग गडे राधाबाई ! आतां एकदम सुरवातच होऊं द्यावी असें मला वाटतें !

**गोपाळः**—ठीक आहे ! शंकरराव, मी सूर धरतों, आपण सुरवात करावी वाजवायला. ( त्याला दाबून आठवन देतो व तो ठीक आहे म्हणतो)

**शंकरः**—ओ यस् सरटनली, ( गोपाळराव वाजावितो व हाहि वेडेंवांकडे तोंड करतो व वाजाविण्याचा आविर्भाव दाखवितो. )

**राधाः**—मोस्ट चार्मिंग ! किती मधुर गाणें आहे. पण काय ग, हे शंकरराव तर मुळींच वाजवीत नाहींतसें वाटतें ?

**चंपाः**—छे, छे ! असें कसें होईल ! अहाहा ! नागसूरच किती झालें तरी म्हणतात ह्याला ! छे बाई, हें ऐकून एखादा नाग—साप घरांत शिरायचा देखील हो !

**गोपाळः**—( सम दाखवून थांबतो व भान न राहून शंकरराव एकटाच फुइमुई फुइमुई करीत बसतो. गोपाळराव त्यास दाबतो. तो लक्ष देत नाहीं. शेवटीं तो त्याला लाथेनें पुढें ढकलतो. ) अहो शंख ! पुरे झालें कीं, वाजविणें ! मूर्ख, बेशरम, गध्धे कुठले !

**शंकरः**—अरे थांब, एवढी एकच तान मारूं दे ! ( राधा व चंपा हंसतात)

**गोपाळः**—अहो मल्हारराव, पुरे कीं आतां वाजविणें ! मूर्ख, बेशरम ! अहो आहे कीं, नाहीं कांहीं अक्कल तुम्हांला ?

**शंकरः**—( चूक लक्षांत येऊन ओशाळा होतो. ) अरे, मी तूं सांगितल्यासारखेंच तर हुबेहुब केलें, उगीच शेवटीं थोडीशी तान मारली

इतकेंच काय तें ! कायरे बाबा, चुकलों नाहींना कांहीं तुझ्या सांगितल्या-प्रमाणें करायला ?

**गोपाळः**—हो; म्हणूनच सांगतों, चला ! चालते व्हा आतां ! चला ! उठा ! अगदीं झंपातालाच्या दुगणींत घरीं चालूं लागा !

**राधाः**—( हो, आतां आपण असाच डाव टाकला पाहिजे. ) कां पण, हें पहा बाई काय तें ! तुम्हांला काय करायचें त्याचें ? नाहीं हो शंकरराव ! मला आवडलें हो तुमचें वाजिवणें ! मोस्ट चार्मिंग !

**शंकरः**—( आनंदित दिसतो ) ऐक ऐक लंबकर्णा ! कांहीं तरी अक्कल तुलाच घे. याला म्हणावें रसिक ! असें नेहमीं तुझें आहे ! तुला काय गाढवाला कळणार माझें उंची गाणें ! पहा कशी मार्मिक आहे राधाबाई ती ! याचकरितां तर गाढवा आपल्या हिंदुस्तानांत स्त्री-शिक्षण जरूर हवें !

**राधाः**—आणि म्हणतें क्षणभर, चांगलें नाहीं वाजविलें, असें जरी धरून चाललें तरी मनुष्याची का किंमत नाहीं कांहीं ? तें कांहीं नाहीं !

**शंकरः**—पहा गोपाळ ! ऐक पुन्हां ! मग आतां हा दास पदरांत घ्यायला कां बरें उशीर राधाबाई ?

**राधाः**—(चंपेला खुणावते.) उशीर कसला, पण माझी एक अट आहे.

**गोपाळः**—ती कोणती ! ( हिचा काय कावा आहे तोच कळत नाहीं ! शेरास सव्वाशेर दिसते ! )

**शंकरः**—हें पहा, मला तुमच्या सगळ्या अटी अगदीं यथासांग कबूल आहेत.

**राधाः**—पण ती तुमच्याशीं अट नाहींच ! हे गोपाळराव जर ह्या माझ्या चंपेशीं लग्न लावायला तयार असले तरच आपल्याबद्दल मी वचन देतें, समजलें ना ? कां कसला विचार करिता गोपाळराव ?

**शंकरः**—( गोपाळाच्या पायां पडतो. ) हें पहा गोपाळकृष्णा ! येऊन दे आतां तरी माझी करुणा तुला ! आतां सगळें तुझ्यावरच अवलंबून आहे ! हे गोपाला, मेरि करुणा क्यौ नही आवे ! दे वरदान एकदाचें !

गोपाळः( –घरीं चालत येत असलेली लक्ष्मी आपण तरी कां लाथाडावी ? ) हो पण, याला आधीं चंपेची कबुली आहे का ?

शंकरः–हें पहा चंपाबाई पुण्यक्षेत्रकामधेनुबाई ! ह्या या दासाला येवढा कौल ! आतांपर्यंत ह्या जिवाची ओढाताण झाली आहे ! येऊन ह्या दया तुमच्या पोटांत माझी !

चंपाः—इश्श बाई, हें पहा काय तें ! मी राधाबाईच्या का बोलण्याबाहेर आहें ?

शंकरः—ऐक ! आतां नाहींना तुझें कांहीं म्हणणें ? नाहीं तर लागशील मागाहून शिव्यागाळी करायला ! मग आतां या उपोषणपीडित दासाला आलिंगन पक्वान्न नाहीं का लवकर द्यायचें ?

गोपाळः—( चंपेला ) ह्या सोनचाफ्याचा आम्हांला नाहीं कां आतां सुगंध द्यायचा ? ( दोघेहि आलिंगनाकरितां पुढें होतात. )

शंकरः–थांबरे ! तुझी भारी बाबा गर्दी जिथें तिथें ! प्रथम माझा तर निकाल लागूं दे !

राधाः—नाहीं. ते कांहीं नाहीं असलें चालायचें, कायदेशीर समारंभाशिवाय काय म्हणून परस्त्रीला स्पर्श करायचा ? चला, लग्नाच्या समारंभाला उशीर असला तरी रजिस्ट्रारसमोर प्रथम लग्न नोंदवून घेऊं या ?

चंपाः—होय बाई, पुरुषांचा कोणीं नेम सांगायचा ? बरी निघाली आहे हो, ही थोडक्यांत सोय !

शंकरः—झालें, थोडा थांबला असतास तर ? गेलें लांबणीवर तुझ्या ह्या गाढवपणामुळें ?

गोपाळः–ठीक आहे, ज्याला कर नाहीं त्याला डर कशाला पाहिजे. हे आम्ही तयार आहोंत रजिष्टार पुढें यायला !

शंकरः—बरें, पण हें आतां उरकणार केव्हां ?

राधाः—जा, आपण तयारीला लागा; आम्ही दोघीजणी तेथेंच कचेरींत येतों.

गोपाळः—ठीक आहे, चला शंकरराव. हो पण, गोविंदराव कुठें आहेत ?

शंकरः—तुला भारी बाबा लोकांच्या रिकाम्या पंचाईती !

चंपाः—अहो, ते आणि सुंदराबाई आळंदीला जातों म्हणून गेलीं आहेत तीं उद्यां सायंकाळीं येतील.

शंकरः – होय का ? ठीक झालें मग बिनबोभाट काम !—चला तर आपण सर्व आपआपल्या तयारीला लागूं.

राधाः—हो, बरी आठवण झाली. ऐकलेंत का ? आम्हीं कचेरींत यायचें तें गोषांतल्या बायांसारखें येऊं. कारण, हें असें, तिथें कचेरींत येण्याची आम्हांला बाई नाहीं संवय; होय ना ग चंपे ?

चंपाः—होय बाई ! आम्ही अगदीं बुरख्यांत येणार ! नाहीं तर नको बाई उगीच त्रास !

गोपाळः—हें पहा, आपण एक वेळ कसेंहि करून नांदा म्हणजे झालें. तुम्हीं गोषांत या, बुरख्यांत या, कशाहि या, या म्हणजे झालें !

शंकरः—याला माझें अनुमोदन आहे. पण आटपा बोवा हा सर्व घोळ लवकर !

---

# प्रवेश ४ था.

—:०:—

सीन—( रस्ता. गणू, सगुणा, वामन, इंदिरा, त्रिंबक, व गुलबाई. )

गणूः—हें बघ लाडके ! पतकरल्यावर लाजूं नये. हं, चल ये पुढें ! चल, आतां कां मुरकतेस ? मी रात्रीं उखळापाशीं पथारी लाऊन पडलों असतांना हळूच मला जागें करतांना मग लाजत नाहींस ती ! हं, अग त्यांत काय आहे ? चल, आपण आपलें लग्न रजिस्टर करून टाकूं. अग ! आज कोण रजिष्टर-आफिसांत गर्दी उसळणार आहे ! आहे का तुला कांहीं कल्पना ? आज नुसतें पेंव फुटलें आहे पेंव ! जो पहावा तो आपला काखेंत फटाकडी घेऊन चालला आहे रजिष्टर कचेरींत ! हं, लाजूं नकोस, लाजूं नकोस ! लाडके, पण काय ही तुझी स्थिति—ते केंस बसी जरा नीट कर ! अगः—

पद—( लोळत कच )

कच मुख मधुवरि ॥ झिंजि कुरळ करि निवारि ॥
नयन सरळ करुनि ॥ हंसरें मुख मज न चोरि
। मलही किति नेत्र कमलीं ॥ ओघळहि तव कपोलीं ॥
चि दंतस्थलीं ॥ गमती हळकुंडापरी ॥ १ ॥

। तुझें जर तिथें घेऊन आलीस तर, तो रजिष्टर मारील कीं
मला दोन फाटके पायपोस !
—हें पहा, असला फाजीलपणा करायचा असला तर मी
! (जाऊं लागते. तो धरून आणतो. )
-हें बघ सगुणे, कां नाक फेंदारलेंस वाटतें ! अग त्यांत काय
। स्वभाव आहे ना ठाऊक तुला ? अग, तुला थट्टा देखील
नाहीं ? वेडीरे वेडी ! नवराबायकोच्या प्रेमाच्या जलशांत
मस्करी, रुसारुशी, फुगाफुगी असल्याशिवाय त्याला रंगच चढ-
सें नाटकांत देखील नाहीं का पाहिलें !
:—गणोबा, किती बाई थट्टा करायची माझी. पदरीं पडून
यावर का थट्टा करायची ? भारी बाई खोडकर स्वभाव हो तुमचा !
अहाहा ! तूं होऊन पदरीं पडलीस वाटतें ? केवढी साळसूद पण !
ा:—कांहीं कां असेना, आतां तर मी तुमची झालेंना, मग
ग्रीचं नसता वाद. मनुष्यानें वागायचें तरी बाई कसें तुमच्याशीं !
हीं म्हणा, पण तुम्हांला एकंदरींत मुळींच मनुष्याची माया
! मी नाहीं जा गडे ! एखाद्याला अगदीं रडकुंडी आणता बाई !
—छे, छे, असें नाहींग सगुणे !

पद—( मेरी फलती फूलती )

नि मना स्वप्नींही ॥ वसे क्षणोक्षणिं ॥ अशी सगुण
ने सगुणा ॥ध्रु०॥ मन कोठें रमेना ॥ जसेंग जीवनाविना ॥
ना मीना ॥ १ ॥

सगुणाः—

नच भुलेन मधूर बोले ॥ मन निष्ठूर कळोनि आलें ॥

गणूः—

नच घेई हे कुतर्क झोले ॥ मन स्वाधीन केव्हांचि केलें ॥

सगुणाः—

पुरे करा स्तुती ही ॥ उगिच शर्करा ॥ मधुर विलेपित वचनें ॥ २ ॥

गणूः–तूं मला फारच वेडी दिसतेस ! चांगल्या सुशिक्षित बायकांच्या संगतींत असून तूं कांहींच त्यांचे गुण उचलले नाहींस याला काय म्हणावें ? अग, इथें तूं नि मी एकटेंच होतों म्हणून उगीच थट्टा केली. तुला झिंजी आवर म्हणून बोलल्याबरोबर राग आला वाटतें ? तुला खरेंच सांगूं का, माझ्या गळ्याशपथ सांगतों. मला तर तूं इतकी सुरेख दिसतेस कीं, तुझ्या पायाची सर त्या नूरजहानला देखील येणार नाहीं, आणि माझी सर त्या जहांगिरला येणार नाहीं ! काय करूं, मजजवळ जर तसे पैसे असते तर, तुझ्याकरितां मीं देखील एक आणखी ताजमहाल मुळामुठेच्या संगमावर बांधला असता ! पण हें ओच्यांत काय आहे ? माझ्याकरितां काय आणलेंस हें ! जड जड दिसतें आहे.

सगुणाः–काहीं नाहीं जा, तुम्हांला थट्टा करायची आहेना ? करा तर खुशाल ! मी नाहीं दाखवीत काय आहे तें.

गणूः—तें कांहीं नाहीं दाखविलेंच पाहिजे, आतां नाहीं थट्टा करायचा. खरेंच नाहीं थट्टा करीत. आतां तर झालेंना ?

सगुणाः–चला, निर्दय कुठले ! माझी किती माया आहे पहा ! आज आईनें मला लाडू पाठविले तर, मेले तुम्हांला दिल्याखेरीज मला गिळवला देखील नाहीं. आणि तुम्ही नाहीं तर ! आमची बायकांचीच माया जास्त असते हो !

गणूः–अहाहा, सगुणे, तूं जितकें माझ्यावर प्रेम करितेस तितकेंच माझें तुझ्यावर आहे. जरीं मीं वरून फणसासारखा खरखरीत फटकळ असलों तरी आंत अगदीं प्रेमाचे गरे आहेत गरे ! आण, लाडू कुठें आहे तो.

अहाहा, अरे वा ! अजून हा असाच हातांत आहे, अजून तो तिथेंच ! मी कां बरेंसारखा याकडे वरच्वेवर वळून पाहात आहें. अहाहा, सगुणे !

पद—( या नवनवल )

या नवनवल मधु लाडवा ॥ बघुनी, चंचल हो मन स्मरुनि अनुभवा ॥ वाटत हा क्षणीं खावा ॥ ध्रु० ॥ बल्लवप्रभुची ही निष्पत्ति ॥ करिल क्षुधेचि समाधि ॥ वाटे शस्त्रचि हें तव हातीं ॥ बुभुक्षिता जिंकाया ॥ १ ॥

सगुणाः—नको, नको, आपणच खा ! पोटभर खाल्ले आहेत माहेरीं !

गणूः—बरें, पण माझा प्रसाद म्हणून तर थोडा खा ! ( ती हात पुढें करते व हा न देतां सर्व खाऊन टाकतो. ) अहाहा, या गोड हातांतला गोड लाडू, गोड गोड भाषण करून मला दिल्यामुळें किती गोड लागला पण मला ! तोंडाला मिठीच बसली ! चल थोडा मला आतां चहा करून दे. चल लवकर, तहान फार लागली आहे. चल—

सगुणाः—हें पहा, दोन वेळ हात पोळले माझे, मी कधींच चहा करणार नाहीं. प्यायचाच असला तर विश्रांतिधामांत दोघेंहि जाऊं या. पण मी मात्र आतां आधणाला शिवणार नाहीं. समजलें का का संगितांत सांगूं ? ऐका तर—

पद—( मी अधना न शिवे )

मीं अधणा न शिवे कधिहीं पुन्हा ॥ ध्रु० ॥ कपबशी फोडुनि फेकुनि दिधली ॥ त्रास नको तो पुन्हा ॥ १ ॥ त्रिवार अनुभव पोळुनि आला बसली बाई भीति मना ॥ २ ॥

गणूः—अरे वा, मला लोक संगित्या म्हणत होते आणि तूं तर सवाई संगीतच दिसतेस ! ठीक, आपलें संगीत जोडपें हें ! चल दुकानांत पिऊन रजिष्टर कचेरींत जाऊं. पण कचेरींत तूं बदलणार नाहींसना ?

सगुणाः— आलांत का पुन्हां पूर्ण रंगावर—चला—कोणी बदलत नाहीं !

गणूः—काय सांगावा बाबा नेम या सुधारणेच्या काळांत !

( गणू व सगुणा जातात व त्रिंबकशास्त्री प्रवेश करतो. )

त्रिंबकः—काय करावें ! आपला कांहीं अजून कुठेंच योग जुळून येत नाहीं ! ब्राह्मणांच्या पांच चार बायका पाहिल्या, पण उड्या मारमारून माझे पाय, गुडघे दुखूं लागले ! कांहीं कांहीं पंचवीस तीस वर्षांच्या वयाच्या कुमारिकांहीं पाहिल्या शेवटीं ! पण त्या पहाव्या तों वाळून कोळ झालेल्या सरड्यासारख्या ! माझ्या घरीं काम करून त्यांचे उलथन्यासारखे हात पाय मोडून तीन दिवसांत खुळखुळा व्हायचा ! तें कांहीं नाहीं ! मी आतांशा आमच्या ब्राह्मणांच्या पोरींचा नादच सोडून दिला आहे ! कुमारिका पाहावी तर ती अचरट ! तावून सुलाखून निघालेली पहावी तर, ती वात्रट ! आणि माझ्या पायांत तर आतां मुळींच बळ नाहीं ! आमच्या वैदिक, शास्त्री मंडळांतून अजून कोणी देश सुधारणेच्या कामांत म्हणावी तशी मुळींच प्रगति केली नाहीं ! कोणी कोणीं आतां ख्रिश्चन झाले आहेत, कोणीं आठ वर्षांच्या परकर नेसणाऱ्या पोरीशीं लग्न लाऊन बसले आहेत, कोणीं कोणी फुलपात्र बाळगून आहेत, किंवा गुलाबी चामुंडेच्या भजनीं आहेत ही गोष्ट निराळी ! पण पेशवाइपासून ह्या सगळ्या अंधपरंपरेच्या जुन्याच गोष्टी आहेत ! तें कांहीं नाहीं ! देशसुधारणेच्या कामांत, रूढी लाथाडण्याच्या कामांत, अद्वितीय मानसिक धैर्य व चिकाटी दाखवून मी किर्ति संपादन करणार ! आणि म्हणूनच ब्राह्मण पोरींबद्दल निराश होऊन हा नवीन घाट जुळवून आणला आहे ! यश देणें विघ्नविनायकाकडे आहे ! आमचा शेजारीं तो मोतीभाई माणिकभाई गुजराथी, ब्राह्मण आहे कीं नाहीं कोणास ठाऊक ! गावांत भीक मागत आज दोन वर्षे हिंडत असतो ! त्यालाच एक भातखांचर व शेत लिहून देऊन त्याची मुलगी गुलबाई मला देण्याचें वचन घेतलें. तिला अत्तां मागोमाग रजिष्टर कचेरींत पाठिवतों असें तो म्हणाला. पण तिचा तर अजून मुळींच पत्ता नाहीं आणि मीं तर शेताचा कागद त्याच्या नांवाचा केव्हांच करून दिला ! सिद्धीविनायक समर्थ आहे ! अर्रर्र ! ती आली वाटतें ! माझी गुलबाई ! ( ती ठुमकत मुरडत प्रवेश करते. ) ओ हो !

गुलबाईः—प्राणनाथ ! मारा लिधे तमुणे घणीबार वाट जोवीपडी एना माटे हूं क्षमा मागूं छे !

त्रिंबकः—नारायण ! मंगलमूर्ते ! गणपते ! समर्थ आहेस ! मला तर हिचें

एक अक्षर समजत नाहीं ! आतां वेळ मारून नेतों झालें ! होय बरें ! घणूं सारूं घणूं ! सारूं ! बरें, समजलें समजलें ! लग्न झालें म्हणजे मग घणूं सारूं होईल बरें ?

**झुलबाईः**—प्राणपति ! तमारी मूर्ति केटली मजाणी देखाय छे ! आ तमारी पगडी, आ तमारो खेस, आ तमारो घेरदार अंगरखो, अने आ तमारी पोथी माराव्हाला ! केवी मजाणी देखाय छे, के तमने कोई बायडी नझर न लगाडे ! ( गालावर बोटें मोडते )

**त्रिंबकः**—करायला गेलों एक, आणि झालें भलतेंच ! आतां गणपते ! हे लगाडे, लगाडे, प्रकरण निस्तरायचें कसें ? ( मला तर घाम सुटला !) होय, होय, घणी लगाडे ! घणी लगाडे ! घणूं लगाडे !

**झुलबाईः**—माराव्हाला ! तमुने मारा माटे केवि बातनो शक आवे छे ! मारा जिवलग, हूं तो तंपर मरूं ! हूं तो तंपर मरूं ! ( पुन्हां बोटें मोडते ! )

**त्रिंबकः**—नारायण ! ही टंपर मरूं, टंपर मरूं काय करते ! पुराणा तरींचा मला एकच नारद तुंबरु केवळ ठाऊक आहे. पण हा शेषशाईच्या दरबारांत दुसरा टंपरमारूं आणखी कोण घुसला ?

**झुलबाईः**—चालो चालोनि, रजिष्टर कचेरिणो टाईम थई जसे ! चालो नि माराव्हाला ! भिवोछे केम ! लेव हवे नखरा ना करों ! हूं तो तंपर मरूं ! चालोनि भिवोछे केम ! हूं तो तंपर मरूं ! माराव्हाला ! ( ओढीत नेते. )

**त्रिंबकः**—चल सटवे ! दोघेंहि एकदाचे रजिष्टर कचेरींत मरूं म्हणजे सुटलों !

( वामनराव व इंदिरा प्रवेश करतात. )

**वामनः**—अग पण थोडें लांबून चाललीस तर ?

**इंदिराः**—कां म्हणून पण ? तें कांहीं नाहीं ! मोटार बायसिकलला जशी साईडकार लावतात, तशी मी निरंतर डाव्या हाताकडे चिकटलेली असणार, समजलेंना !

**वामनः**—पण इंदिरे, ही मोटार बायसिकल कशाच्या जोरावर चालली आहे, त्याचें नांव सांग पाहूं ? तुझ्यासारख्या रिपब्लिक राज्यांतही, पुन्हां मॉनर्की घडवून आणणारी जी शक्ति आहे तिचें नांव तरी सांग इंदिरे—

पद–( जाको सुख देत )

नांव वद काय तें मनमोहन ॥ ध्रु० ॥ न पुरे मनिं कधींहि हाव, येई सकल जन धाव ॥ पंगुहि उल्लंघन नग करि मूक गान, बधिरांसहि दे श्रवण ॥ १ ॥ हंसवित विरही, निरखवि अंधा ॥ मूढ सूज्ञ करि भ्याड धीर ॥ स्पर्शतांचि करि मृतवत दिव्यरूप काय ॥ २ ॥

**इंदिराः**—समजलें हो नांव त्या जादूचें ! लोकसत्तात्मक राज्यांत पुन्हां भूपति स्थापून त्याला राज्यारोहण, अभिषेक करविणारी अशी सामर्थ्यवान् देवता एकच आहे, तिचें नांव प्रीती, हेंच ना नांव तिचें ?

**वामनः**—आहेसच तूं चतुर !

**इंदिराः**—आहांत, आपण माझे राजेच आहांत हो ! प्राणनाथ, हृदय-मंदिरांतील सिंहासनावर विराजित होऊन, वसनवलयांकित शरीरप्रदेशावर सुखानें राज्यकारभार करा ! आपली राजाज्ञा पाळण्याकरितां सर्व इंद्रिय-गणासह्वर्तमान सेवेला मी निरंतर तत्पर राहीन. चला, आपल्याला प्रीतीनें या देहाचे भूपति निवडलें खरें, पण कायद्याप्रमाणें राज्यारोहण झालें पाहिजे !

**वामनः**—आपल्या राज्यारोहणाची तयारी रजिष्टर कचेरींत जारीनें सुरू आहे, चल तर समारंभ उरकून घेऊं !

**इंदिराः**—चला, माझा कुठें ना आहे ?—

पद—( चलो हटो न )

चला राजाधिराज ! माझे राजे ! मनमोहन ॥ ध्रु० ॥ मधुप रसिक तुम्हीं मीहि कमलिनी ॥ देव तुम्हीं मीहि दासी मनमोहन ॥ १ ॥ चंद्रनभीं तुम्हीं तेज कला मी ॥ सूर्य तुम्हीं मीहि प्रभा मनमोहन ॥ २ ॥ अमृत जरि तुम्हीं संजिविनी मी ॥ सिंधु तुम्हीं सरिता मी मनमोहन ॥ ३ ॥ प्रेमें उताविळ प्रिया मन झालें माझें ॥ चला राजे मनमोहन ॥ ४

# प्रवेश ५ वा.

—:०:—

सीन—रजिस्टर-कचेरीचा देखावा--रजिस्ट्रार, दोन शिपाई, एक कारकून, वामन, इंदिरा; सुंदरा, गोविंदराव; दामिनी, डाक्तर; राधा, गोपाळराव ; चंपा, शंकरराव; सगुणा व गणू. ( आंगठ्याचे छाप घेण्याचें डेस्क, साबण, पाणी, व टुवाल वगैरे सामान.)

रजि०:—काय हो लक्ष्मणराव, सर्वांना टाइम दोन वाजायचीच सांगितली आहे ना, मग उशीर कां?

लक्ष्मणः—येतीलच इतक्यांत मंडळी.

रजि०:—माझ्या सगळ्या सर्व्हिसमध्यें एकाच मुहुर्तावर इतकी रजिस्ट्रेशन्स करण्याचा आज पहिलाच दिवस. बहुतेक हाच प्रघात जास्त वाढणार खास !

लक्ष्मणः—लवकरच भटजींचे नि वाजंत्र्याचे ताबूत थंडे होणारसें दिसतें. उगीच त्यांची टुरटुर नको. अरे कुणी आलें वाटतें. (गोविंदराव, व सुंदराबाई प्रवेश करतात. सुंदराबाई खुर्चीवर बसतात. )

गोविंद:—लवकरच आमच्या सह्या घेऊन, रजिस्टर केलें तर ठीक पडेल. जरा जलदीचें काम आहे.

रजि०:—थोडे पांच मिनिटें थांबा, आणखीही मंडळी येणार आहेत, तेव्हां एकदम उरकूं. हे पहा आलेच. ( गोपाळ व शंकर प्रवेश करितात व त्यांच्या मागून चंपा व राधा प्रवेश बुरख्यांत करतात. )

राधाः—हं, चंपे, आतांच आहे सगळें काम, ठरल्यासारखें करायचें बरें का.

चंपाः—त्याची नको काळजी.

राधाः—अगबाई, हे कोण बाबांच्या बरोबर इथें, ( राधा गोपाळरावाजवळ बसते. )

चंपाः—चल, आतां चुकवा-चुकव करून काय उपयोग ? ( चंपा शंकररावाजवळ बसते. )

( वामन, इंदिरा; सगुणा व गणू येतात व बसतात. )

रजि०:—लक्ष्मणराव, आणखी कोणी यायचें राहिलें नाहीं ना?

लक्ष्मणः—नाहीं, सर्व मंडळी आली. आज ऊत आला आहे लोकांना !

रजि०:—ऑलराईट देन, मग सुरवात करूं या. कम लॉंग फर्स्ट पेअर, ( सुंदरा, गोविंद ) तुम्ही गोविंदरावाशीं नांदायला तयार आहांत?

सुंदराः—इश्श बाई, हें काय विचारणें, आहेंच तयार !

रजि०:—तुम्ही त्या म्हातारीला नांदवायला तयार आहांत !

गोविंदः—(अहो, टीका करायचें कांहीं काम नाहीं.) हो तयार आहें.

रजि०:—ठीक आहे, वहा शपत आणि सह्या करा.

लक्ष्मणः—परमेश्वराला साक्ष ठेऊन खरें सांगतों, आम्ही उभयतां यापुढें नवरावायको सारखे नांदून सरकारची राजनिष्ठ प्रजा वाढवूं, ( त्या तेंस म्हणतात. ) ठीक आहे जा तुम्ही, तिकडे आंगठ्याचे छाप द्या.

शिपाईः—हं, सावण लावा, आंगठा धुवा, चला लवकर, ( तो छाप घेतो. ) ( वरीलप्रमाणें गोविंदराव, सुंदरा; वामन, इंदिरा; शपथ घेऊन ठसे देतात. )

राधाः—आलीग चंपे आपली पाळी आतां ?

चंपेः—आतांच तर सगळें आहे.

रजि०:—काय हो, शंकरराव हिला नांदवायला तयार आहांत का !

शंकरः—त्याकरतांच तर येवढें नाटक झालें आतांपर्यंत !

रजि०:—ठीक आहे, वहा शपथ, करा सह्या. ( लक्ष्मण शपथ देतो. )

शंकरः—घे, लाडके राधे, घे शपथ, मी तुला अगदीं विसरणार नाहीं.

चंपाः—हें का मला सांगायला हवें ? ( शपथ घेतात. ) ( गोपाळ-राधाही शपथ घेतात. )

गणूः—लाडके चल, आपणही या वाहत्या गंगेंत हात धुवून घेऊं. सही करतां येत नाहीं ! दोघांच्या निशाण्या कपबशी लावा !

(त्रिंबकशास्त्र्यास गुलबाई ओढीत आणते.)

गुलबाईः—रजिष्टरसाहेब ! जरा मारा लिधे हुवागे हुवारो ! अमारो अटलू लगन रजिस्टर करीनाखो ! चालोना माराव्हाला ! आं ! मरे मूवा ! मू फाडींनें केम उभाछे ! हा हा करींने सूजूवोछे !

त्रिंबकः—हं पापांचा घडा कांठोकांठ भरला म्हणून मला हे डोहाळे झाले ! मंगलमूर्ते, समर्थ आहेस ! चल सटवे आतां!

झुलबाईः—चालो ! मू फाडीनें केम उभाछे !

त्रिंबकः—गणपते, तूं आहेस ! हं आतां फाडून खा किंवा चाऊन खा! सांपडलों खरा तुझ्या तावडींत! ( दोघेही टेबलाजवळ जातात. )

राजि०ः—( पूर्वींप्रमाणें त्यांस प्रश्न विचारतो. )

त्रिंबकः—होय तर, भातखाचर नि शेत केव्हांच लिहून दिलें हिच्या बापाला !

झुलबाईः—तमे खाचरोनीफाचरो कांहीं खाकघूल मारा बापनी दीधी असे, एमामारे सूंछे ? हूं तो तमारा प्रेमना माटे तमूनें वरूंछूं !

राजि०ः—( पूर्वींप्रमाणें तिला प्रश्न विचारतो. )

झुलबाईः—हां, हां, मारा तन बदन निसारकरी पणवा तयार छू !

लक्ष्मण—( शपथ देतो व सह्या घेतो ! त्या अंगठ्याचे छाप देतात. )

झुलबाईः—प्राणनाथ, मारा माटे केवी बातनो शक आवे छे ! हमे गुजराथी ब्राह्मणनी बायडीयो साधीभोळी होईयेछे ! प्राणनाथ ! बोलोनि ! हूं तो तंपर मारूं.

त्रिंबकः—योग्य ! मारी घणूं सारूं तंमपर मारूं लगाडी बायडी ! योग्य ! ( हात जोडतो ) क्षमा कर ! एक शब्द आतां मात्र बोलूं नकोस !

शंकरः—लाडके राधे, काढ आतां बुरखा. तुझा लाडका चेहरा केव्हां दृष्टीस पडेल, असे झालें आहे. चंपा ( बुरखा काढते व शंकरराव दचकतो, ) अरे ती बघ कोण आहे.

गोपाळः—आं राधे ! हें काय हें ?

राधाः—तें कांहीं आतां चालायचें नाहीं, अगदीं हडसूनखडसून झालें.

गोपाळः—जाऊं द्या झालें आतां शंकरराव, पदरीं पडलें नि पवित्र झालें.

शंकरः—आतां काय त्याचें, दगडापेक्षां वीट मऊ, ये तूं माझी सोनतुकडी ! ( दोघे आलिंगन देतात. )

गोविंदः—अग सटवे चंपे, तूंग इकडे कुणीकडे ?

**चंपाः**—इकडेच तुमच्या मागोमाग राधाबाईच्या बरोबर ज्ञानेश्वरांच्या दर्शनाला आलें सहज !

**सुंदराः**—जाउंन द्या गडे ! आपण कशाला तो संताप करून घ्यायचा बाई ! ही अलीकडची तरुण प्रजा अगदीं उंडारलेली आहे हो ! वडील-माणसांचा मुळीं देखील मान ठेवायचा नाहीं म्हणजे काय ?

**इंदिराः**—इश्श, या गोपाळकाल्यांत कुणीं कुणावर रागाऊं नये बाई !

**वामनः**—मी असें प्रपोजल पुढें आणतों कीं, या समारंभांतील गोष्टीविषयीं सर्वत्रांनीं कांहीं एक विषाद न मानितां शेवट सर्वत्रांच्या गोड मैत्रींत व्हावा. ( सर्वजण सेकंडेड सेकंडेड म्हणतात. )

## कोरस.

पद—( तुसाडे नारे गला )

उमललीं पहा सगळीं फुलें ॥ विश्व धुंद हो परिमलें ॥ जालिं स्थलिं, नभिंही फुलें ॥ मन लोभलें ॥ ध्रु० ॥ अचिंत्य चिंतुनि मन बावरलें निराधार घाबरलें ॥ हीं वाहूं कवणा फुलें ॥ न मला कळे ॥ १ ॥

